# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ४७**

---

### महसूल व वन विभागाच्या जमिनीवर वर्षानुवर्ष शेती करुन उपजिविका करणाऱ्या शेतकऱ्यांना जमिनीचे हक्क देण्याबाबत

**(१) ५२३२ (१०-०४-२०१५). श्री.धनंजय मुंडे, डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महसूल व वन विभागाच्या जमिनीवर वर्षानुवर्ष शेती करुन उपजिविका करणाऱ्या शेतकऱ्यांना जमिनीचे हक्क देण्याचा निर्णय झालेला असतानासुध्दा बऱ्याच शेतकऱ्यांना जमिनी मिळाल्या नाहीत, अशी बाब माहे फेब्रुवारी २०१५ मध्ये वा त्यासुमारास निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाने जमिनीचे हक्क देण्यासंदर्भात आलेल्या दाव्यापैकी सुमारे ३७ हजार दावे नाकारले असून १६ हजार दावे प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शेतीवाहिवाट करत असणाऱ्या भोगवटादाराच्या नावांवर जमिनी कराव्यात असा शासन आदेश असतानासुध्दा प्रशासनाने त्याकडे लक्ष दिले नाही म्हणून सदरची प्रक्रिया खोळंबली होती, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, शासनाकडे सादर झालेल्या दाव्यामध्ये मंजूर दाव्यांचे ७/१२ शेतकऱ्यांच्या नावे करण्यासाठी वेळ लागत असल्याने प्रशासनाने काही दावे

छोटे-मोठे कारण देऊन नाकारल्याचे प्रकरण पुढे आले आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०३-११-२०१८) :** (१), (२), (३), (४) व (५) शासकीय जमिनीवरील मागासवर्गीय व इतर भूमिहीन व्यक्तींची दिनांक ०१/०४/१९७८ ते १४/०४/१९९० या कालावधीतील शेती प्रयोजनासाठी केलेली अतिक्रमणे नियमानुकूल करण्याचा निर्णय शासनाने दिनांक २८/११/१९९१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. यानुसार शासकीय व पड जमिनीवरील ९७,३९३ अतिक्रमणांपैकी विहित कार्यवाहीनंतर ३५,५६५ अतिक्रमणे नियमित करण्यात आली आहेत तसेच ६०९३४ प्रकरणी नाकारण्यात आली असून, ८९४ प्रकरणांवर निर्णय घेण्याची कार्यवाही सुरु आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईत अत्यल्प जागेत राहणाऱ्या कुटुंबांना स्वस्त दरातील घरे उपलब्ध करुन देण्याबाबत

**(२) ११३१० (२३-१२-२०१५). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) स्मार्ट सिटी संकल्पनेत मुंबईत सद्यःस्थितीत अत्यल्प जागेत राहणाऱ्या सुमारे १७ लाख कुटुंबांना स्वस्त दरातील घरे निर्माण करण्याचा विचार शासनाच्या विचाराधीन असल्याचे दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरील बेघर व पदपथावर संसार करणाऱ्या रहिवाशांकडून शासन कोणता कर आकारीत आहे तसेच त्यांना शासनाची स्वस्त घरे परवडणारी आहेत काय,

(३) नसल्यास, स्वस्त दरातील घरे देण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१८) :** (१) सन २०११ च्या जनगणनेनुसार राज्यात जवळपास १९ लाख इतक्या घरांच्या तुटवडा असल्याचे आढळून आले आहे. त्यानुषंगाने प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत सन २०२२ पर्यंत १९.४० लाख घरकुलांच्या निर्मितीचे उद्दिष्ट राज्याने निश्चित केले आहे.
(२) बृहन्मुंबई महानगरपालिकेतर्फे बेघर व पद पथावर संसार करणाऱ्या रहिवाश्यांकडून कोणताही कर आकारला जात नाही.
(३) सन २०२२ पर्यंत देशाला स्वातंत्र मिळून ७५ वर्षे पूर्ण होत असताना देशातील प्रत्येक कुटूंबाला पक्के घर असायला हवे, या हेतूने मा.पंतप्रधान, भारत सरकार यांनी जून, २०१५ मध्ये “सर्वांसाठी घरे” या संकल्पनेवर आधारीत प्रधानमंत्री आवास योजनेची घोषणा केली आहे. या योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने मंत्रिमंडळाच्या मान्यतेने दिनांक ९/१२/२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. केंद्र शासनाने आतापर्यंत ३८२ शहरांच्या योजनेतील समावेशनास मान्यता दिली आहे.

प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना तसेच पात्र गृह प्रकल्पांना विविध सवलती राज्य सरकारने मंजूर केलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या धर्तीवर जुन्या मोडकळीस आलेल्या इमारतींची पावसाळ्यापुर्वी कार्यवाही करण्याबाबत

**(३) १८९२५ (२८-०४-२०१६). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाच्या नगरविकास विभागाने जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतींबाबत पावसाळ्यापूर्वी करावयाच्या कार्यवाहीबाबत मुंबई महापालिकेच्या धर्तीवर राज्यातील सर्व महापालिकांनी कार्यपध्दती आखावी असे परिपत्रक जारी केले असल्याचे माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील महापालिकांनी मुंबई महापालिकेच्या धर्तीवर कार्यपध्दती आखण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-१०-२०१८) :** (१) व (२) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या धर्तीवर जुन्या मोडकळीस आलेल्या इमारतीबाबत पावसाळ्यापुर्वी करावयाच्या कार्यवाहीबाबत सर्व महानगरपालिकांना मार्गदर्शक सूचना दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये दिल्या आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उल्हासनगर महानगरपालिकेतील एल.बी.टी.विभागातील गैरव्यवहार व कंळबोली सेक्टर २० मधील इमारतीतील बेकायदेशीर सदनिकांबाबत

**(४) २०२४४ (२३-०८-२०१६). श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर : तारांकित प्रश्न क्रमांक १५७११ ला दिनांक ६ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उल्हासनगर महापालिकेतील एलबीटी विभागातील गैरव्यवहार प्रकरणी दोषी आढळलेल्या ५० कर्मचाऱ्यांची चौकशी पूर्ण झाली आहे काय,
(२) असल्यास, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुसार संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) तसेच, मौजा रोडपाली येथील भिवंडीवाला ट्रस्टच्या जमिनीसंदर्भात कंळबोली सेक्टर २० भूखंड क्र. ४ (क्षेत्र १६२०० चौ.मी.) येथील भूखंडावर बांधलेल्या इमारतीमध्ये एकूण किती सदनिका बेकायदेशीर व विनापरवाना बांधल्या असल्याचे निदर्शनास आले आहे,
(४) असल्यास, उक्त सर्व प्रकरणी जबाबदार असलेल्या तत्कालीन विशेष भूसंपादन अधिकारी, रायगड यांचेविरुध्द सुरु असलेली चौकशी पूर्ण झाली आहे काय,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१८)** : (१) व (२) सदर प्रकरणी उल्हासनगर महानगरपालिकेच्या स्थानिक संस्था कर विभागातील एकूण ६२ कर्मचाऱ्यांना नोटीस देऊन खुलासा मागविण्यात आला होता.

त्यापैकी १६ कर्मचाऱ्यांवर विभागीय चौकशी प्रस्तावित करण्यात आली असून, ती अंतिम टप्प्यात आली आहे. सदर चौकशीच्या निष्कर्षानुसार संबंधित कर्मचाऱ्यांवर उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत प्रशासकीय कारवाई करण्यात येणार आहे.

(३) व (४) मौजा रोडपाली-कळंबोली येथील सेक्टर २० मधील भूखंड क्रमांक ४ वरील ३२४ निवासी सदनिका व ५ वाणिज्य सदनिका अशा बांधकामास सिडकोमार्फत दिनांक १०/१०/२०१२ रोजी भोगवटा प्रमाणपत्र देण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## चारा छावण्यांवरील खर्चासाठी 'वेगवर्धित चारा विकास कार्यक्रमांतर्गत' केंद्र शासनाकडे मागणी केलेल्या निधीबाबत

**(५) २१९६२ (१९-०८-२०१६). श्री.आनंदराव पाटील** : सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चारा छावण्यांवरील खर्चासाठी 'वेगवर्धित चारा विकास कार्यक्रमा' (Accelerated Fodder Development Program) अंतर्गत राज्य शासनाने केंद्र शासनाकडे मागील वर्षात निधीची मागणी केली होती काय,

(२) असल्यास, केंद्र शासनाकडून किती मदत मिळाली तसेच, मागणी केलेल्या निधीपैंकी उपलब्ध झालेल्या निधीचा तपशील काय आहे,

(३) असल्यास, या कार्यक्रमांतर्गत प्राप्त झालेल्या निधीच्या वाटपाचा तपशील जिल्हावार काय आहे,

(४) असल्यास, दुष्काळादरम्यान किती जनावरांच्या छावण्या चालू होत्या, त्यामध्ये एकूण जनावरांची संख्या किती आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०९-१०-२०१८) :** (१) होय.
(२) सन २०१७-१८ मध्ये राज्यात दुष्काळसदृष्य परिस्थिती नसल्याने राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत गतिमान वैरण विकास योजना व अतिरिक्त गतिमान वैरण विकास योजनेसाठी केंद्र शासनाकडून निधी उपलब्ध झालेला नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पानगाव व नळेगाव (जि.लातुर) करीता स्वतंत्र पोलीस ठाण्याच्या प्रस्तावास मंजुरी देण्याबाबत

**(६) २२८५० (२४-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) लातुर जिल्ह्यातील पोलीस दप्तरी संवदेनशील म्हणून नोंद असलेल्या पानगाव आणि नळेगावच्या स्वतंत्र पोलीस ठाण्याच्या प्रस्ताव प्रलंबित असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर पोलीस ठाण्याच्या प्रस्तावावर शासनाने निर्णय घेवून त्यांना मंजुरी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-१०-२०१८) :** (१) व (२) लातुर जिल्ह्यातील रेणापूर पोलीस ठाणे अंतर्गत मौजे पानगांव येथे दुरक्षेत्र असून रेणापूर पोलीस ठाण्याचे विभाजन करून नवीन पानगाव पोलीस ठाणे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला असून सदर प्रस्तावाबाबत उपस्थित मुद्याच्या अनुषंगाने पोलीस महासंचालक कार्यालयाकडून माहिती मागविण्यात आली आहे.

तसेच पोलीस अधीक्षक, लातुर अंतर्गत चाकुर पोलीस ठाण्याचे विभाजन करून नवीन नळेगांव पोलीस स्टेशन निर्माण करण्याचे पदनिर्मितीच्या ४ थ्या टप्प्यामध्ये प्रस्तावित आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वाळकेश्वर येथील जय किसान या उपकरप्राप्त इमारतीच्या पुनर्विकासात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(७) २४५६८ (०४-०१-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक १४७८५ ला दिनांक ३० मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाळकेश्वर येथील मोक्याच्या ठिकाणी असलेल्या जय किसान (इमारत क्र. २२०) या उपकरप्राप्त इमारतीच्या पुनर्विकासाच्या नावाखाली मे.लेयर एक्स्पोर्टस् प्रा.लि. या विकासकाने सदनिकांची संख्या व चटईक्षेत्र फुगवून कोट्यवधी रुपयांचा गैरव्यवहार केला असल्याची बाब माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी लोकायुक्तांकडे तक्रार दाखल झाल्यानंतर सुनावणीवेळी तत्कालीन गृहनिर्माण विभागाचे सचिव (श्री.सिताराम कुंटे), विद्यमान मा.गृहनिर्माण मंत्री यांचे खाजगी सचिव (श्री.श्रीकांत फुलकुंडवार), तत्कालीन उपसचिव (श्री.दिलीप शिंदे) व तत्कालीन अवर सचिव (श्री.संतोष भोगले) तसेच इतर कर्मचाऱ्यांनी विकासकाशी संगनमत करुन मोठा गैरव्यवहार केला असल्याचे नमूद आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या गैरव्यवहार प्रकरणी लाचलुचपत विभागाच्या पथकांकडून संबंधित चौकशी सुरु असून आपल्या पदाच्या दुरुपयोग करुन दबाव टाकण्याचा प्रयत्न केला, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या उच्चपदस्थ अधिकाऱ्यांची नावे आदर्श तसेच अन्य गैरव्यवहारात निदर्शनास आली असून अनेक गैरव्यवहारात नावे निदर्शनास येऊनही या उच्चपदस्थ अधिकाऱ्यांवर कोणतीही कारवाई झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२१-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सदर मिळकतीचा पुनर्विकास करताना वि.नि.नि. १९९१ विनिमय ३३(७) अंतर्गत दिनांक ०९/०४/१९९७ रोजी ना-हरकत प्रमाणपत्र प्रदान करताना त्यावेळी लागू असलेल्या तरतुदीनुसार चटई क्षेत्र निर्देशांक २.०० किंवा मूळ उपकरप्राप्त इमारतीत वापरण्यात आलेला चटई क्षेत्र निर्देशांक यापैकी जो अधिकचा असेल त्यानुसार ना-हरकत प्रमाणपत्र प्रदान करण्यात आले होते.

सदर मालमत्तेचा पुनर्विकास करताना विकासकाने ४८ बोगस भाडेकरु / रहिवाशी दाखवून अतिरिक्त चटईक्षेत्र मिळवून जास्तीचे बांधकाम केल्याची तक्रार शासन व मा.लोकायुक्त, महाराष्ट्र शासन यांच्याकडे प्राप्त झाली. अशा स्वरुपाच्या तक्रारीच्या अनुषंगाने म्हाडाने तपासणी केली असता यात तथ्य आढळले व या इमारतीमध्ये ०९ भाडेकरु / रहिवाशी राहत असल्याचे सिध्द झाले. सदरची बाब ऑगस्ट, २०१६ दरम्यान निदर्शनास आलेली नाही.

(२) हे खरे नाही.

(३) सदर प्रकरणी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून उघड चौकशी सुरू आहे.

(४) हे खरे नाही.

(५) व (६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळासोबत विकासकाने बांधलेल्या इमारतीचे अतिरिक्त क्षेत्रफळ म्हाडाकडे सुपूर्द न करणाऱ्या विकासकांवर कारवाई करण्याबाबत

**(८) २४९११ (०४-०१-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप : तारांकित प्रश्न क्रमांक २२०४८ ला दिनांक २० जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील म्हाडाच्या मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळासोबत विकासकाने बांधलेल्या इमारतीचे अतिरिक्त क्षेत्रफळ म्हाडाकडे सुपूर्द न करणाऱ्या २९ विकासकांवर ३४ कोटीचा दंड ठोठावला असल्याचे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनस्तरावर दंड न भरणाऱ्या विकासकांवर काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (३०-०८-२०१८)** : (१) व (२) मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींच्या पुनर्विकासानंतर मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळास देय असलेले अतिरिक्त बांधकाम क्षेत्रफळ मंडळास दिलेले नसल्याचे एकूण ३३ प्रकरणे निदर्शनास आली आहेत. सदर ३३ प्रकरणांपैकी विक्रीयुक्त बांधकाम अद्याप सुरु करण्यात आलेले नाही अशी २ प्रकरणे, गुन्हा नोंदविण्यापूर्वी मंडळास अतिरिक्त बांधकाम क्षेत्रफळ सुपूर्द केले असे १ प्रकरण व न्यायप्रविष्ट असलेले १ प्रकरण असे ४ प्रकरणे वगळता इतर २९ प्रकरणांमध्ये म्हाडामार्फत संबंधित पोलीस स्टेशनमध्ये गुन्हे नोंदविण्यात आलेले आहेत. तद्नंतर सर्व प्रकरणे आर्थिक गुन्हे अन्वेषण विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आली आहेत. सदर २९ प्रकरणांपैकी दोन प्रकरणांमध्ये विकासकांनी मंडळास देय असलेले अतिरिक्त क्षेत्रफळ सुपूर्द केल्याने मा.न्यायालयाच्या आदेशानुसार या दोन विकासकांविरुध्दचे फौजदारी खटले मंडळाद्वारे मागे घेतली आहेत. तर एका प्रकरणामध्ये विकासकाने दंडाची रक्कम सुपुर्द करुन मंडळास देय अतिरिक्त क्षेत्रफळाबाबत मंडळासोबत नोंदणीकृत करारनामा केल्याने हे ३ प्रकरणे वगळता उर्वरित २६ प्रकरणांमध्ये म्हाडाद्वारे नोंदविण्यात आलेल्या गुन्ह्यांच्या आधारे मुंबई आर्थिक गुन्हे अन्वेषण विभागामार्फत तपासअंती मेट्रोपोलिटिएन न्यायालयात दोषारोपपत्रे दाखल करण्यात आली आहेत.

सदर २९ प्रकरणांपैकी ०८ प्रकरणांमध्ये शासनाने दिनांक १५/१०/२०१२ रोजीच्या पत्राव्दारे कळविल्यानुसार, विकासकाने म्हाडास एकूण ७५०.३५ चौ.मी. ऐवजी ७६०.०३ चौ.मी. अतिरिक्त बांधकाम क्षेत्रफळ सुपूर्द केले आहे. तसेच दंडात्मक रक्कमेपोटी एकूण १,७३,८४,००७/- इतक्या रक्कमेचा भरणा केलेला आहे.

उर्वरीत २१ प्रकरणांमध्ये म्हाडास देय असलेले अतिरिक्त बांधकाम क्षेत्रफळ १०२२९.२२ चौ.मी. इतके आहे, त्यापैकी विकासकाने ५४०९.०४ चौ.मी. अतिरीक्त बांधकाम क्षेत्रफळ मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळास सुपूर्द

केले आहे व ४८२०.१८ चौ.मी. अतिरीक्त बांधकाम क्षेत्रफळ सुपूर्द करावयाचे आहे.

सदर २१ प्रकरणांमध्ये मे, २०१८ पर्यंत दंडात्मक रक्कम रुपये ४७,७०,७३,८९८/- इतकी आहे. त्यापैकी विकासकांनी ८,०६,०९,१११/- इतकी रक्कम म्हाडास भरणा केली आहे व उर्वरित रक्कम रुपये ३९,६४,६४,७८७/- इतकी रक्कम येणे बाकी आहे.

आर्थिक गुन्हे विभागाने ज्या विकासकांनी मंडळास अतिरीक्त बांधकाम क्षेत्रफळ सुपूर्द केले नाही. तसेच दंडात्मक रक्कम भरली नाही. अशा मालक / विकासकांविरुध्द मेट्रोपोलिटएन न्यायालयात दोषारोप पत्र दाखल केलेले आहे. ज्या विकासकांनी अद्यापपर्यंत अतिरीक्त बांधकाम क्षेत्रफळ म्हाडास सुपूर्द केले नाही. तसेच दंडात्मक रक्कम भरलेली नाही, अशा मालक / विकासकाच्या मालमत्तेबाबतची माहिती विविध विभागांकडून जसे की जिल्हाधिकारी (मुंबई शहर / उपनगर / ठाणे), उपनिबंधक (शहर) व रिझर्व बँक ऑफ इंडिया यांच्याकडून माहिती मागविण्यात आलेली आहे. सदर माहिती प्राप्त होताच त्याची मालमत्ता जप्त करण्यासाठी जिल्हाधिकारी (शहर), यांना म्हाडाकडून कळविण्यात येईल व त्यातून प्राप्त होणाऱ्या रक्कमेतून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास येणारी रक्कम वसुल करण्यात येईल.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## हिंगोली येथे छत्रपती शिवाजी महाराज यांचा पुतळा उभाण्याबाबत

**(९) ३०५२८ (१४-०४-२०१६). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली येथे छत्रपती शिवाजी महाराज यांचा पुतळा उभारण्याकरीता सन २०१६ मध्ये वा त्यादरम्यान रास्ता रोको आंदोलन करण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त ठिकाणी पुतळा उभारण्यात यावा यासाठी अनेक शिवभक्तांनी दिनांक २६ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास आत्मदहन करण्याचा इशारा लेखी निवेदनाद्वारे जिल्हा प्रशासनाला दिला होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त ठिकाणी छत्रपती शिवाजी महाराज यांचा पुतळा उभारण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०९-२०१८) :** (१) व (२) होय.
(३) पुतळे उभारण्यासाठीच्या मार्गदर्शक तत्वांनुसार राष्ट्रपुरुष / थोर व्यक्ती यांचा पुतळा उभारण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकाऱ्यामार्फत शासनास सादर होणे अपेक्षित असते.

पुतळा उभारु इच्छिणारी व्यक्ती वा संस्थेने हिंगोली शहरात छत्रपती शिवाजी महाराज यांचा पुतळा उभारण्यास मान्यता मिळण्याबाबत जिल्हाधिकाऱ्यांना प्रस्ताव सादर केलेला नाही. त्यामुळे पुढील कार्यवाही होऊ शकलेली नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महात्मा ज्योतिबा फुले सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या सदनिका वाटपात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(१०) ३४५९२ (१८-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे, डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महात्मा ज्योतिबा फुले सहकारी गृहनिर्माण संस्था, महाराष्ट्र नगर, मानखुर्द (पूर्व), मुंबई-८८ येथील संस्थेमधील जुन्या सभासदांना डावलून नवीन सभासदांना सदनिकांचे वाटप झाल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर गृहनिर्माण संस्थेमध्ये सदनिका मिळण्याकरीता प्रत्येक सभासदांनी रुपये २ लाख २५ हजार भरलेले असून देखील अनेक सभासदांना सदनिकांचे वाटप करण्यात आलेले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर सदनिका वाटप प्रकरणात संस्थेचे संस्थापक व मुख्य प्रर्वतक यांनी करोडो रुपयांचा गैरव्यवहार केला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त संपूर्ण प्रकरणाची शासनाने चौकशी करुन जुन्या व पात्र सभासदांना सदनिका देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०६-१०-२०१८) :** (१), (२), (३), (४) व (५) शासन निर्णय क्र. शिपुयो.२००१/प्र.क्र.५८/गृनिधो-२, दिनांक ७ ऑक्टोबर, २००६ नुसार उक्त झोपडपट्टीवासियांना सदनिका देण्यासाठी यादी तयार करणे, किंमत अदा करणे, सभासदांचे पुनर्वसन योग्य रीतीने होईल याची दक्षता घेणे, सदनिकांचे परिरक्षण इत्यादी बाबींची जबाबदारी महात्मा ज्योतिबा फुले या संस्थेची आहे. तसेच यासंदर्भात तत्कालीन मा.मुख्यमंत्री यांनी दिनांक ४ जून, २००८ रोजी घेतलेल्या बैठकीतील निर्णयानुसार चेंबूर, कुर्ला येथील नगर भूमापन क्र. १२६/२ वरील आरक्षित भूखंडावरील झोपडपट्टीवासियांच्या स्थलांतरासाठी सदरहू संस्थेस वितरीत करण्यात आलेल्या काही सदनिका महात्मा ज्योतिबा फुले सहकारी गृहनिर्माण संस्थेकडून अन्य व्यक्तींना वितरीत झाल्याचे आतापर्यंतच्या तपासणीत सकृतदर्शनी निदर्शनास आले आहे.

सदर घरे झोपडपट्टीधारकांनाच वितरीत करण्यात आले, याबाबतचा कोणताही पुरावा संस्थेने दिलेला नाही.

सदनिका वाटप प्रकरणात गैरव्यवहार झाल्याच्या तक्रारी पोलीस विभागाकडून प्राप्त झाल्या होत्या. त्याबाबत शिवशाही पुनर्वसन प्रकल्पाकडून संबंधित पोलीस स्टेशनला माहिती कळविण्यात आली आहे.

जनहित याचिका क्रमांक ३७/२०१४ मधील मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार सदर प्रकरण मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांच्याकडे सुनावणीसाठी असतानाच याचिकाकर्ते श्री.कैलास निवृत्ती केदारे यांनी सदर प्रकरण मागे घेण्याकरीता केलेल्या विनंती अर्जावरुन मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांनी सदर प्रकरण दिनांक २४ जानेवारी, २०१८ रोजी निकाली काढलेले आहे.

## मुंबईतील मालाड (पूर्व) येथील श्री.स्वामी समर्थ एसआरए योजनेबाबत

**(११) ३४६५३ (२३-१०-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सीटीएस नं. ६२० ए/१-ए-४ (भाग) ६२० सी आणि ६५७ मुंबईतील मालाड (पूर्व) येथील श्री.स्वामी समर्थ एसआरए योजना विकासक कुंजन प्लॅनर्स प्रा.लि. यांचेकडून राबविण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या योजनेत एसआरएला विकासकाकडून किती पीएपी मिळणे आवश्यक आहे, विकासकाने आतापर्यंत किती पीएपी एसआरएकडे हस्तांतरीत केल्या, हस्तांतरीत केल्या नसल्यास त्याची कारणे काय व त्याबाबत एसआरएने विकासकाविरुध्द कोणती कारवाई केली,

(३) असल्यास, हस्तांतरीत करावयाच्या ४९ पीएपीमध्ये अनधिकृत कुटुंबे राहत असल्याचे विकासकाने कळविले होते काय, तसेच त्याने संबंधितांविरुध्द एफआयआर दाखल करुन एसआरएला कळवले होते काय व त्यावर काय कारवाई करण्यात आली,

(४) असल्यास, विकासकानेच करारनामे करुन या योजनेतील १०८ पीएपीची विक्री केली असल्याचे पुरावे एसआरएकडे सादर करण्यात आले आहेत, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, विकासकाविरुध्द कोणती कारवाई करण्यात आली, तसेच एसआरएने पीएपी मिळण्याबाबत काय प्रयत्न केले,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०३-०८-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) सदर झोपडपट्टी पुनर्वसन योजनेमधील एकूण ९५ प्रकल्पबाधित सदनिकांपैकी ४९ प्रकल्पबाधित सदनिका विकासकाने झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाकडे हस्तांतरीत केल्या असून उर्वरीत ४६ प्रकल्पबाधित सदनिकांमध्ये घुसखोरी झाल्याचे आढळल्याने विकासकाने शेजारील भुखंड विकत घेऊन त्यावर प्रकल्पबाधित सदनिका बांधून देत आहे. तोपर्यंत त्याचे विक्री घटकाचे बांधकाम रोखून ठेवण्यात आले आहे.

प्रकल्पबाधित सदनिकांमधील घुसखोरीबाबत विकासकाने झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास कळविले आहे तथापि, एफआयआर दाखल केलेला नाही असा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचा अहवाल आहे.
(४) हे खरे नाही.
(५) विकासक शेजारील भुखंड विकत घेऊन त्यावर उर्वरीत प्रकल्पबाधित सदनिका बांधुन देत आहे. विकासकाने सदर इमारतीचे बांधकाम पूर्ण होऊन भोगवटा प्रमाणपत्र मिळण्यासाठी अर्ज केला आहे. तोपर्यंत त्याचे विक्री घटकाचे बांधकाम झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने रोखून ठेवले असल्याचा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचा अहवाल आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लोकप्रतिनिधींच्या पत्रांना शासन परिपत्रकामधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत

**(१२) ३४६५९ (१३-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासन परिपत्रक क्रमांक विमंस-२०१३/प्र.क्र.६७/१८ (र.व का.) दिनांक २७ जुलै, २०१५ च्या कलम ४ व ५ अन्वये लोकप्रतिनिधींच्या पत्रांना विहित कालावधीत पोच देणे व दोन महिन्याचे आत अंतिम उत्तर देणे तसेच विहीत नमुन्यात नोंदवही / संगणकीय नोंद ठेवणे बंधनकारक करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात लोकप्रतिनिधींनी माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान मुख्य सचिवांना पत्र दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अशा प्रकारे कार्यवाही केली जात नसल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, अशा प्रकारे विहित कालावधीत पोच न देणे, अंतरिम व अंतिम उत्तर न देणे तसेच या परिपत्रकाच्या कलम ५ मधील तरतुदीनुसार विविक्षीत नमुन्यात नोंदवहया न ठेवणे यासाठी आजपर्यंत किती अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशीची कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०९-२०१८) :** (१) होय.
(२) होय.
(३) व (४) दिनांक २७ जुलै, २०१५ च्या परिपत्रकामधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण२०१७/प्र.क्र.१७१/१८(र.व.का.), दिनांक २७ ऑक्टोबर, २०१७ अन्वये पुन्हा सर्व विभागांना सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार उचित कार्यवाही संबंधित प्रशासनिक विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांचेकडून केली जात आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कौशल्य विकास प्रशिक्षण घेतलेल्या प्रशिक्षितांना नोकऱ्या देण्याबाबत

**(१३) ३५१६३ (०४-०१-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे जिल्हयात १८६२ शासकीय कौशल्य विकास प्रशिक्षितांपैकी फक्त २२७ बेरोजगारांना नोकऱ्या मिळाल्याचे दिनांक ९ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विदर्भातील जिल्हयांमध्ये कौशल्य विकास प्रशिक्षण घेतलेल्या प्रशिक्षितांना मोठ्या प्रमाणात नोकऱ्या मिळाल्या नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्‌नूसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२७-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही, माहे डिसेंबर, २०१७ अखेर ठाणे जिल्हयात ५०३३, प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांपैकी १०७२ उमेदवारांना नोकरी / स्वयंरोजगार प्राप्त झालेला आहे.

(२) हे खरे नाही, माहे डिसेंबर, २०१७ अखेर विदर्भामध्ये २५८८३ प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांपैकी ९१६८ उमेदवारांना नोकरी / स्वयंरोजगार प्राप्त झालेला आहे.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाचा गृहनिर्माण विभाग तसेच एसआरएने योजनांचा आढावा घेतल्याबाबत

**(१४) ३५७७० (०४-०१-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्रीमती विद्‌या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाचा गृहनिर्माण विभाग तसेच एसआरएने माहे जानेवारी, २०१६ ते माहे जुलै, २०१७ या काळातील एसआरए योजनांचा आढावा माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या आढाव्यात काय आढळून आले व तद्‌नुसार शासनाने संबंधितावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०३-०८-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## भोगवटा प्रमाणपत्र (ओसी) नसले तरी मानीव अभिहस्तांतरण करुन देण्याचा निर्णयाबाबत

**(१५) ३५८१५ (०४-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार, श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भोगवटा प्रमाणपत्र (ओसी) नसले तरी मानीव अभिहस्तांतरण (डिम्ड कन्व्हेयन्स) करुन देण्याचा निर्णय शासनाने घेतल्यामुळे सोसायटयांना मालकी देताना नियोजित आराखड्याच्या बाहेर जाऊन विकासकांनी किंवा फ्लॅट मालकांनी संबंधित जागेत केलेल्या बेकायदेशीर बांधकामाची सगळी जबाबदारी सोसायटीवर येऊन त्या सोसायटीना दंड भरावा लागणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विकासकाच्या चुकीचा फटका फ्लॅट धारकांना बसत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाची भूमिका काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२२-१०-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

मानीव अभिहस्तांतरणाबाबतच्या दिनांक १८/०९/२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार संबंधित गृहनिर्माण संस्थेने मानीव अभिहस्तांतरणासाठी सर्व जबाबदाऱ्या घेत असल्याचे स्व-प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

(२) अंशत: खरे आहे.

(३) अशा प्रकारच्या घटना टाळण्यासाठी महाराष्ट्र स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ लागू करण्यात आला असून त्यातील कलम १७(१) मधील तरतुदीनुसार संबंधित प्रमोटर (बिल्डरने) गृहनिर्माण संस्थेस बांधकाम पूर्णत्वाच्या दाखल्याच्या दिनांकापासून ३ महिन्याच्या आत अभिहस्तांतरण करुन देणे बंधनकारक करण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सरखेल कान्होजी राजे आंग्रे यांचे समाधी स्थळावरील ध्वनीप्रकाश प्रकल्पाबाबत

**(१६) ३७१९० (०४-०१-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे येथील शनिवारवाड्याच्या धर्तीवर अलिबाग (जि.रायगड) येथील सरखेल कान्होजी राजे आंग्रे यांच्या छत्रीबाग येथील समाधीस्थळ परिसरात अलिबाग नगरपरिषदेमार्फत उभारण्यात येणारा ध्वनिप्रकाश प्रकल्पाचा प्रस्ताव नगरविकास विभागाकडे मागील ६ वर्षांपूर्वी सादर करण्यात आलेला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कान्होजी राजे आंग्रेचा इतिहास जिवंत ठेवण्यासाठी सदर ध्वनिप्रकाश प्रकल्पाच्या माध्यमातून कान्होजी राजे आंग्रे यांचा जीवनपट मांडण्यात येणार आहे तसेच येथे ॲम्फीथिएटरही उभारण्यात येणार असून या ठिकाणी कान्होजी राजे आंग्रे यांच्या पराक्रमावर आधारित लघुपट तसेच माहितीपट दाखविण्यात येणार आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकल्पासाठी आवश्यक असणाऱ्या निधीसह सादर केलेल्या प्रकल्पास नगरविकास विभागाकडून मंजूरी देण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर ध्वनीप्रकाश प्रकल्प उभारण्यासाठी शासनाकडून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१८) :** (१) व (२) अशा आशयाचा प्रस्ताव शासनास सादर केल्याचे मुख्याधिकारी, अलिबाग नगरपरिषद यांनी कळविले आहे.
(३) व (४) उपलब्ध अभिलेख्यांमध्ये सदरहू प्रस्ताव आढळून आलेला नाही.
तथापि, याबाबतचा प्रस्ताव नव्याने सादर करण्याच्या सूचना जिल्हाधिकारी, रायगड यांना देण्यात आल्या आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

___________

## रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि रायगड या तीन जिल्ह्यात मोफत वायफाय सुविधा देणेबाबत

**(१७) ३७५४१ (०४-०१-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि रायगड या तीन जिल्ह्यात मोफत वायफाय सुविधा देणेबाबत केंद्र शासनाच्या दुरसंचार मंत्रालयाने सकारात्मक दृष्टीकोन दाखवत पुढील कार्यवाही करण्याची भूमिका घेतली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त तीन जिल्ह्यात मोफत वायफाय सेवा सुरु होण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मात्र सदर सेवा या तीन जिल्ह्यात सुरु व्हावी यासाठी राज्य शासनाने केंद्र शासनाकडे कोणता पाठपुरावा केला वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे. Universal Service Obligation WiFi प्रकल्पांतर्गत रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि रायगड या तीन जिल्ह्यात मोफत वायफाय सुविधाबाबत केंद्र शासनाच्या दूरसंचार मंत्रालयाने कळविले आहे. सदर सुविधा ही ग्रामीण दुरध्वनी केंद्रापासून ७०-१०० मीटरच्या त्रिज्येमधील परिसरात पुरविण्यात येईल.

(२) नाही, हे खरे नाही. मोफत वायफाय सुविधा सुरुवातीला विनामूल्य आहे परंतु नंतर शुल्क आकारले जाईल.

(३) राज्य शासनाने एकूण ३ विभागाचा प्रस्ताव मा.ना.श्री.अनंतजी गिते, राज्यमंत्री, केंद्रीय अवजड उद्योग मंत्रालय यांच्याकडे सादर केलेला आहे. सदर प्रकल्पाचे काम सुरु असून ते डिसेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्भवत नाही

---

## राज्यातील कामगारांच्या सुरक्षेबाबत

**(१८) ३७५४६ (०४-०१-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात असुरक्षित कामगारांची संख्या दिवसेंदिवस मोठ्या प्रमाणात वाढत असून शासनाचे याकडे दुर्लक्ष होत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कामगार असुरक्षित राहू नयेत यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०८-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) सन २०१७ मध्ये ३७७ कारखान्यांच्या भोगवटादारांवर/व्यवस्थापकांवर मुख्य न्याय दंडाधिकारी यांच्या न्यायालयात एकूण ४३१ खटले दाखल केलेले आहेत.

सन २०१७ मध्ये ११४ कारखान्यांमध्ये १३७ कामगारांचा अपघातात मृत्यू झालेला असून त्यांच्या भोगवटादार/व्यवस्थापकाविरुध्द ११५ खटले न्यायालयात दाखल केलेले आहेत. उर्वरित खटले कारखान्यांचे निरीक्षण/तक्रारींच्या चौकशी दरम्यान आढळलेल्या कारखाने अधिनियम, १९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम, १९६३ च्या इतर भंगाकरीता दाखल झालेले आहेत.

संचालनालयाच्या सुरक्षा विषयक जन जागृतीमुळे व विविध उपक्रमांमुळे कारखान्यांमध्ये अपघाताचे प्रमाण कमी झालेले आहेत. त्यामुळे राज्यात असुरक्षित कामगारांची संख्या दिवसेंदिवस मोठ्या प्रमाणात वाढत असल्याची बाब खरी नाही.

आग/स्फोट/अपघात इत्यादींची चौकशी दरम्यान अशाप्रकारच्या घटनांची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून उपाययोजना सूचविले जातात व त्यांच्या पुर्ततेचा अहवाल व्यवस्थापनास सादर करण्याच्या सूचना दिल्या जातात. त्यानंतर भेट/निरीक्षणावेळी सूचविलेल्या उपाययोजनांची पुर्तता झाली किंवा नाही, याची पाहणी केली जाते. जेथे पुर्तता झाली नसल्याचे निदर्शनास

आले त्या संबंधित कारखान्यांच्या भोगवटादार/व्यवस्थापकाविरुध्द कायदेशीर कार्यवाही करण्यात येते.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## एमपी मिल कंपाऊंड झोपडपट्टी पुनर्वसन प्रकल्पातील गैरव्यवहाराच्या चौकशीबाबत

**(१९) ३७८०१ (०६-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, डॉ.सुधीर तांबे, अॅड.हुस्नबानू खलिफे, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.मोहनराव कदम, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, आर्कि.अनंत गाडगीळ : तारांकित प्रश्न क्रमांक ३४८९४ ला दिनांक १३ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील ताडदेव येथील एमपी मिल कंपाऊंड झोपडपट्टी पुनर्वसन प्रकल्पात तसेच घाटकोपर व कांदिवली येथील समता नगर या ठिकाणच्या म्हाडाच्या पुनर्वसन प्रकल्पांमध्ये मोठ्या प्रमाणात झालेला गैरव्यवहार व अनेक नियमबाहय झालेल्या कृती याबाबत सन २०१७ मधील विधीमंडळाच्या पावसाळी अधिवेशनात मा.गृहनिर्माण मंत्री यांच्यावर सभागृहात मा.सदस्यांनी केलेल्या विविध आरोपांच्या अनुषंगाने सुरु करण्यात आलेली चौकशी पूर्ण झाली आहे काय,
(२) असल्यास, त्यात कोणत्या बाबी स्पष्ट झालेल्या आहेत व तद्‌नुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२७-०८-२०१८) :** (१) व (२) न.भू.क्र. ७२५(पै)/१/७२५(पै) आणि ३/७२५ (पै) मलबार हिल येथील नियोजित महाराष्ट्र नगर डी वॉर्ड तसेच जायफळवाडी आणि जनता हिल झोपडपट्टी पुनर्वसन योजनेसंदर्भात

गृहनिर्माण विभागाच्या धारिकेतील प्रस्तावावर चौकशी करण्यासाठी, महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम, १९७१ मधील कलम १७(३) नुसार, मा.राज्यपाल महोदयांनी मा.लोक आयुक्त यांना सदर प्रकरण निर्देशित केले असून मा.लोक आयुक्त यांचेकडे सदर चौकशीची कार्यवाही सुरु आहे.

समतानगर, कांदिवली (पूर्व) येथील विकास नियंत्रण नियमावली ३३(५) अंतर्गत सुरु असलेल्या पुनर्विकास प्रकल्पाबाबत उच्चस्तरीय समितीद्वारे चौकशी सुरु आहे.

तसेच पंतनगर, घाटकोपर येथील संक्रमण शिबीराच्या लगत असलेल्या सर्व झोपडपट्टयांचे भूखंड हे विना विकास क्षेत्रात बाधित असल्याने अविकसनक्षम (Non Buildable) आहेत त्यामुळे सदर ०७ झोपडपट्टया व पंतनगर, घाटकोपर येथील न.भू.क्र. १९४ (भाग) वरील म्हाडाच्या मालकीची संक्रमण शिबीरे मिळून एकत्रित पुनर्विकास करण्याचा वि.नि.नि. ३३(१०) नुसार करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदरहू संक्रमण शिबीरे व परिसरातील ०७ झोपडपट्टयांचा एकत्रित पुनर्विकास वि.नि.नि.३३(१४) ऐवजी ३३(१०) मध्ये रुपांतरित करुन शासनाने शासन निर्णय झोपुयो-१२०३/प्र.क्र.२४१/२०१६/झोपसु-१, दिनांक ०६/०१/२०१७ अनुसार मान्यता दिली आहे. हे आदेश कोणत्याही विकासकाचा नामनिर्देश करुन काढण्यात आलेले नाहीत. तसेच या एकत्रित योजनेत अद्याप कोणत्याही विकासकाचा प्रस्ताव दाखल झालेला नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राजापूर (जि.रत्नागिरी) शहरातील शासकीय गावठाण जागा तेथील रहिवाशांच्या नावावर करण्याबाबत

**(२०) ३८०७९ (०६-०४-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राजापूर (जि.रत्नागिरी) शहरातील बाजारपेठेतील १.१५ हेक्टर जागा शासकीय गावठाण असून या गावठाण जागेवर मागील १५० वर्षापासून १०९ घरे व दुकाने असून नागरिक तेथे वास्तव्य करीत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर जमिनीचा ७/१२ सध्या राहत असलेल्या रहिवाशांच्या नावावर नसल्यामुळे रहिवाशांना घर दुरुस्ती करणे, नवीन बांधकाम करणे तसेच बँकांकडून कर्ज घेणे इत्यादी बाबीसाठी रहिवाशांना मोठ्या अडचणी येत आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर क्षेत्राचा सिटी सर्व्हे करण्यात येऊन मोजणी झालेली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदरहू गावठाण जागेवर असलेली घरे सध्या राहत असलेल्या रहिवाशांच्या नावावर करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१८-०९-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सदरची जागा ही शासकीय गावठाण असल्यामुळे नगरपरिषदेमार्फत इमारत दुरूस्ती, नुतनीकरण अशा बांधकाम परवानग्या तहसिलदार, राजापूर यांच्याकडून ना-हरकत दाखला प्राप्त झाल्यानंतरच देण्यात येतात, ही वस्तुस्थिती आहे.
(३) राजापूर नगरपरिषद क्षेत्राचे भूमापनाचे काम जिल्हा अधीक्षक, भूमी अभिलेख कार्यालय, रत्नागिरी यांच्या सनियंत्रणाखाली सुरू आहे, असे नगरपरिषदेच्या अहवालात नमूद केले आहे.
(४) नगरपरिषदेच्या हद्दीतील गावठाण जागेवर असलेली घरे पुर्वापार त्या ठिकाणी राहत असलेल्यांच्या नावावर असल्याचे नगरपरिषदेने कळविले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद महानगरपालिका अग्निशमन दलासाठी नवीन पदनिर्मिती करणेबाबत

**(२१) ३८७२६ (०६-०४-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी : तारांकित प्रश्न क्रमांक ३२१८६ ला दिनांक २६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद महानगरपालिका अग्निशमन दलासाठी "महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान" अंतर्गत नवीन पदनिर्मितीसाठी महानगरपालिकेने आकृतीबंध ठरविला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महानगरपालिकेतील पाच अग्निशमन केंद्र व सात अग्निशमन वाहनासाठी अग्निशमन विभागास २३२ अधिकारी/कर्मचारी पदे निर्माण करण्यास महानगरपालिकेने दिनांक ७ सप्टेंबर, २०११ रोजीच्या सर्वसाधारण सभेत मान्यता दिली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर २३२ पदे मान्य करणेसाठी शासनाकडे प्रस्ताव सादर केला असून तो प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रस्ताव मंजूर करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२५-०९-२०१८) :** (१), (२), (३) व (४) औरंगाबाद महानगरपालिकेतील अधिकारी/कर्मचारी यांच्या पदांचा आकृतिबंध तसेच सेवाप्रवेश नियमास मान्यता देण्याचा प्रस्ताव महानगरपालिकेने शासनाकडे सादर केला होता.

सदर प्रस्तावास महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेच्या मान्यतेची आवश्यकता असल्याने, मान्यता घेऊन सदर प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांना कळविण्यात आलेले आहे.

औरंगाबाद महानगरपालिकेच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदांचा आकृतिबंध अंतिम करुन तो सर्वसाधारण सभेच्या मान्यतेसाठी महानगरपालिका प्रशासनाने सादर केलेला होता.

महानगरपालिका प्रशासनाने सादर केलेल्या प्रस्तावामध्ये सर्वसाधारण सभेने एकूण ३९ दुरुस्त्या सुचविलेल्या आहेत. सदर दुरुस्त्यांबाबत सखोल अभ्यास करुन आकृतिबंधाबाबतचा परिपूर्ण प्रस्ताव महानगरपालिका प्रशासनाकडून शासनाकडे सादर करण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात मेंढी चराईसाठी उपलब्ध वन विभाग क्षेत्राच्या अभ्यासासाठी स्थापन केलेल्या समितीच्या अहवालाबाबत

**(२२) ३९०८३ (०४-०४-२०१८). डॉ.परिणय फुके, श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड : तारांकित प्रश्न क्रमांक २७६९६ ला दिनांक २३ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मेंढी चराईसाठी उपलब्ध असलेल्या व नसलेल्या वन विभागाच्या क्षेत्राबाबत अभ्यास करण्यासाठी शासनाने दिनांक २ सप्टेंबर, २०१५ रोजी एक समिती स्थापन केली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर समितीचा अहवाल डिसेंबर, २०१५ अखेर पूर्ण होईल असे आश्वासन मा.वने मंत्री महोदयांनी दिनांक १० डिसेंबर, २०१५ रोजी देण्यात येऊनही समितीचा अहवाल शासनास सादर करण्यात आला नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने समितीचा अहवाल सादर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) दिनांक ०२/०९/२०१५ रोजी गठीत करण्यात आलेल्या समितीने आपला अहवाल दिनांक २८/०३/२०१६ रोजी शासनास सादर केला आहे. सदर समितीने सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने काही अटी व शर्तीच्या

अधिन राहून बुलढाणा व जळगाव जिल्ह्यातील ३००० पेक्षा जास्त मेंढी संख्या असलेल्या तालुक्यांसाठी वनक्षेत्रात (वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ अंतर्गत घोषित संरक्षित क्षेत्र वगळून) सन २०१७ व २०१८ या दोन वर्षामध्ये दिनांक १ जून ते दिनांक ३० सप्टेंबर या कालावधी प्रायोगिक तत्वावर मेंढी चराई परवाने जारी करण्याबाबत परवानगी देण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील कुर्ला विभागात एसआरए इमारतीसाठी नियमानुसार रस्त्यासाठी जागा सोडली नसल्याबाबत

**(२३) ३९१०८ (०६-०४-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील कुर्ला विभागात सांताक्रुझ-चेंबुर लिंकरोड जवळ विठ्ठल साळुंखे मार्गावर (मसरानी लेन) सायबा ग्रुपकडून बांधण्यात आलेल्या गौरीशंकर एसआरए इमारत व हंस रेसिडेन्सी या इमारतीसाठी महानगरपालिकेच्या नियमानुसार रस्त्यासाठी जागा सोडणे बंधनकारक असताना सदर जागा सोडण्यात आली नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गौरीशंकर एसआरए इमारतीचा काही भाग नाल्यावर बांधला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त बांधकामे एसआरए व महानगरपालिकेच्या अधिकाऱ्यांच्या संगनमताने बांधलेली असल्याने उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून संबंधित दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०३-०८-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## श्री.राजराजेश्वर मंदिराला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देणेबाबत

**(२४) ३९५९२ (०६-०४-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला जिल्ह्याचे आराध्य दैवत श्री.राजराजेश्वर मंदिराला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अकोला शहरातील हे अतिप्राचीन मंदिर असून येथे स्वयंभू शिवलिंगाचे दर्शन घेण्याकरीता हजारो भाविक येत असतात, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर मंदिराला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक ३ जुलै, २०१७ रोजी व त्यासुमारास मा.नगरविकास राज्यमंत्री तथा पालकमंत्री जि.अकोला यांना तसेच जिल्हाधिकारी, अकोला, आयुक्त, महानगरपालिका अकोला यांच्याकडे पत्राद्वारे मागणी केली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त मागणीच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-१०-२०१८) :** (१), (२), (३), (४) व (५) श्री राजराजेश्वर मंदिर संस्थानाला “ब” तीर्थक्षेत्राचा दर्जा देण्याबाबत लोकप्रतिनिधींचे निवेदन जिल्हाधिकारी, अकोला यांना प्राप्त झाले आहे.

सदर मंदिर संस्थान अकोला महानगरपालिका क्षेत्रातील असल्याने शासन धोरणानुसार प्रस्ताव सादर करण्याबाबत जिल्हाधिकारी, अकोला यांनी महानगरपालिकेस कळविले आहे.

तथापि, श्री राजराजेश्वर मंदिर संस्था विश्वस्त मंडळ अथवा अकोला महानगरपालिकेने सदर मंदिरास “क” किंवा “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देण्याचा प्रस्ताव सादर केला नसल्याचा अहवाल जिल्हाधिकारी, अकोला यांनी सादर केला आहे.

---

## देना बँकत मुदत ठेवी तारण ठेवून राज्य शासनाचे नुकसान केल्याबाबत

**(२५) ४०१०९ (०६-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाच्या चार विभागांचे १९४ कोटी रुपये बोगस दलाल विमल मालुका ऊर्फ विमन बारोट यांच्या मध्यस्थितीने मुंबई मलबार येथील देना बँकेत ठेवलेल्या मुदत ठेवी तारण ठेवून बारोट याने त्यावर कर्ज काढून थकविल्यामुळे शासनाचे नुकसान झाल्याचे दिनांक १० जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-१०-२०१८) :** (१) व (२) सदर प्रकरणात फिर्यादी हे मुंबई महानगरक्षेत्र विकास महामंडळ (एम.एम.आर.डी.ए.) या कार्यालयात पदावर असतांना नमूद प्राधिकरणाने देना बँक, मलबार हिल शाखेमध्ये मुदत ठेवीमध्ये रुपये ३५१.५० कोटी ठेवले होते. तथापि, अज्ञात इसमांनी बनावट कागदपत्रांच्या आधारे नमूद बँक मध्ये खाती उघडून रुपये ४५.२३ कोटीचा अपहार करून फसवणूक केल्याचे तक्रारीवरुन केल्याने मलबार पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. ६०/२०१४, नोंद करुन गुन्हाचा पुढील तपास आर्थिक गुन्हे विभाग, गु.र.क्र. ६६/२०१४ कलम ४२०, ४६५, ४६७, ४६८, ४७१, १२०(ब) भा.दं.वि. अन्वये तपासावर घेण्यात आला होता. परंतु, सदर गुन्हयाचा तपास केंद्रिय अन्वेषण विभाग, मुंबई यांचेकडे वर्ग करण्यात आल्याने, सदर गुन्हयाची कागदपत्रे पुढील तपासकामी बँक सिक्युरिटीज ॲण्ड फ्रॉड सेल, सी.बी.आय. मुंबई यांना हस्तांतरीत करण्यात आली असून सी.बी.आय. मुंबई मार्फत एकुण ५ आरोपींविरुध्द मा.मुंबईच्या विशेष न्यायालयात दोषारोपपत्र सादर करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

## राज्यात बेरोजगारीचे प्रमाणात वाढ झाल्याबाबत

**(२६) ४०३५२ (०६-०४-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्रातील बेरोजगारीचे प्रमाण मागील दहा वर्षामध्ये मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या मेक इन इंडिया, स्कील इंडिया व मुद्रा योजनेतून बेरोजगार तरुणांना अत्यंत अल्प प्रमाणात रोजगार प्राप्त झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनस्तरावर काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२७-०९-२०१८) :** (१) खरे नाही, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्रात नोंदणी केलेल्या उमेदवारांची मागील १० वर्षात बेरोजगारीचे प्रमाण वाढलेले नाही, मार्च, २०१८ अखेर नाव नोंदणी केलेले उमेदवार १४९२६८ इतके आहे व नोंदणी पट ३९०७९५७ इतकी आहे.

(२) हे खरे नाही. मेक इन महाराष्ट्र-२०१६ या कार्यक्रमात उद्योग विभागाशी निगडीत एकूण २८५० सामंजस्य करार झाले असून, त्यापैकी २३५१ प्रकल्प प्रगतीपथावर असून त्याद्वारे ३८३६३१ कोटीची गुंतवणूक अपेक्षित असून १२०१९५६ इतकी रोजगार निर्मिती अपेक्षित आहे.

प्रधानमंत्री मुद्रा योजनेंतर्गत नवउद्योजकांना नवीन उद्योगासाठी त्याचप्रमाणे चालू उद्योगाची वाढ करण्यासाठी आर्थिक वर्ष २०१५-१६ पासून राज्यातील विविध राष्ट्रीयकृत बँका तसेच वित्तीय संस्था यांचेमार्फत विनातारण रुपये १० लाखाच्या मर्यादेत कर्ज पुरविण्यात येते.

(३) व (४) बेरोजगारी दूर होण्याच्या अनुषंगाने सुशिक्षीत बेरोजगारांना रोजगार मिळावा म्हणून रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम, व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र, प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान

तसेच पंतप्रधान रोजगार निर्मिती योजना, सुधारित बीज भांडवल योजना व जिल्हा उद्योग केंद्र कर्ज योजना तसेच स्वयंरोजगारासाठी आण्णसाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळामार्फत वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना, गट कर्ज व्याज परतावा योजना व गट प्रकल्प कर्ज योजना इ. योजना राबविण्यात येतात.

---

## बार्शी (जि.सोलापूर) येथील पोलीस ठाणे कार्यान्वित करण्याबाबत

**(२७) ४०४०३ (०६-०४-२०१८). श्री.रामहरी रुपनवर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बार्शी (जि.सोलापूर) येथील पोलीस ठाण्याचे उदघाटन झाले नसल्याने जनतेची गैरसोय होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नव्याने निर्माण होणाऱ्या उक्त तालुका पोलीस ठाण्यामध्ये पांगरी पोलीस ठाण्याच्या हद्दीतील दूरक्षेत्र अंतर्गत येणाऱ्या ५६ गावांपैकी ३३ गावे येणार असून या गावातील नागरिकांची होणारी गैरसोय दूर होणार असल्याने यासंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०८-२०१८) :** (१) व (२) बार्शी तालुका पोलीस ठाणे निर्माण करण्याची अधिसूचना दिनांक ३०/०६/२०१७ रोजी निर्गमित करण्यात आली असून सदर पोलीस ठाणे दिनांक ०१/०५/२०१८ रोजी कार्यान्वित झालेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

# मोखाडा (जि.पालघर) तालुक्यातील पोलीस पाटलांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२८) ४०५७८ (०६-०४-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मोखाडा (जि.पालघर) तालुक्यातील अनेक गावात पोलीस पाटलांची पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त तालुक्यात मंजूर असलेल्या ४३ पदांपैकी २८ पदे भरले असून पोशेरा, कारेगाव, डोल्हारा, पळसुडा, पाथर्डी, निळमाती, खोच, हिरवे, दांडवळ, पिंपळपाडा, सावर्डे, शिवली, बोटोशी, पाचघर व मो-हाडा येथील १५ पदे गेल्या अनेक वर्षापासून रिक्त असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) जव्हार उपविभागात मोखाडा तालुक्याकरीता एकूण ४३ पोलीस पाटील पदे मंजूर असून त्यापैकी २८ पदे भरण्यांत आली आहेत, तर १५ पदे रिक्त आहेत. सदर पदे ही संबंधित पदावरील पोलीस पाटील मयत झाल्याने तसेच काही पोलीस पाटील सेवानिवृत्त झाल्याने रिक्त झाली आहेत. त्यानुषंगाने सदरची रिक्त पदे भरण्याची कार्यवाही उपविभागीय अधिकारी, जव्हार यांचे स्तरावरुन सुरु करण्यांत आलेली आहे.

(४) अशी बाब नाही.

___

## सोलापूर बसस्थानकातील सुरक्षा यंत्रणेबाबत

**(२९) ४०६९८ (०६-०४-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर बसस्थानकावर दिनांक १ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास चोरटयांनी १४ लाख ७६ हजारांची रोकड चोरल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त बसस्थानकात रोज येणाऱ्या गाड्या आणि प्रवाशी संख्या मोठ्या प्रमाणात असून सुरक्षा यंत्रणा प्रत्यक्ष कार्यरत नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०८-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे. परंतु सदरची घटना दिनांक ३०/१२/२०१७ रोजी घडलेली आहे.

(२) हे खरे नाही.

सोलापूर बस स्थानकावर कोणताही कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होवू नये याकरीता २४ तास कर्मचारी नेमण्यात आलेले असतात. रात्रपाळी व दिवसपाळीसाठी २ पोलीस कर्मचारी व ४ बीट मार्शल नेमण्यात आलेले असतात. पिटर वन व पिटर टू मोबाईल पेट्रोलिंग करीता ४ पोलीस अधिकारी व ६ पोलीस कर्मचारी नेमण्यात आलेले असतात.

तसेच एस.टी. महामंडळाकडून सुरक्षेसाठी १२ सुरक्षा रक्षक दिवस व रात्रपाळीसाठी नेमण्यात आलेले आहे.

(३) दिनांक ३०/१२/२०१७ रोजी घडलेल्या चोरीप्रकरणी फौजदारी चावडी पोलीस स्टेशन, सोलापूर शहर येथे गु.र.नं. ७६९/२०१७ भा.दं.वि. कलम ३७९ प्रमाणे अज्ञात आरोपींविरुध्द गुन्हा दाखल आहे. सदर गुन्ह्याचा तपास सुरु असून मा.न्यायालयात 'अ' वर्ग समरी अहवाल मंजुरी करीता सादर करण्यात आला आहे.

(४) विलंब झालेला नाही.

---

## औरंगाबाद येथे लहान मुलांसाठी मिनी ट्रेन सुरु करण्याबाबत

**(३०) ४११०७ (०६-०४-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद येथील सिडको-हडको येथील सिडको एन-८ भागातील बॉटनिकल गार्डन परिसरात गेल्या तीन वर्षापूर्वी लहान मुलांसाठी मिनी ट्रेन सुरु करण्याच्या प्रस्तावास शासनाने मंजुरी दिली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर मिनी ट्रेन चालू करण्यासाठी आवश्यक त्या सोई-सुविधा निर्माण करण्याकरीता सन २०१४ मध्ये ३० लाख रुपयांचे अनुदान तत्कालीन मा.पालकमंत्री, औरंगाबाद जिल्हा यांनी शासनामार्फत सदर महापालिकेस उपलब्ध करुन दिले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अनुदान उपलब्धतेनंतर प्रत्यक्षात मिनी ट्रेन येऊन तसेच दोनदा या मिनी ट्रेनचे ट्रायल घेऊन केवळ ट्रेन ड्रायव्हर नसल्याचे कारण देऊन ही ट्रेन गेल्या दोन वर्षापासून बंद अवस्थेत असल्याचे दिनांक २६ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर मिनी ट्रेन सुरु करण्याबाबत चौकशी करुन कार्यवाही करण्यात यावी अशा स्वरुपाच्या तक्रारी येथील स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे करुनही कार्यवाही झाली नसल्याचे दिनांक १९ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार संबंधितांविरुद्ध कारवाई करून उक्त ट्रेन सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

महानगरपालिका क्षेत्रात मूलभूत सोयी सुविधा विकास कामाकरीता अनुदान योजनेंतर्गत गठीत केलेल्या समितीकडून सदर प्रस्तावासाठी महानगरपालिकेस अनुदान मंजूर केलेले होते. परंतु प्रत्यक्षात सदर अनुदान महानगरपालिकेस प्राप्त झालेले नाही.

(३) हे खरे नाही.

संबंधित एजन्सीने महानगरपालिकेच्या ट्रेन ड्रायव्हरला प्रशिक्षण देवून मिनी ट्रेन सुरु केलेली होती. तथापि, सदर मिनीट्रेनमध्ये तांत्रिक बिघाड झाल्यामुळे मिनी ट्रेन बंद ठेवण्यात आलेली आहे.

(४) हे खरे आहे.

(५) औरंगाबाद महानगरपालिकेच्या एन-८ सिडको येथील बॉटनिकल गार्डनमध्ये लहान मुलांसाठी सन २०१४ च्या आर्थिक वर्षात मिनी ट्रेन सुरु करण्यात आलेली होती. तथापि, सदर मिनी ट्रेनमध्ये तांत्रिक बिघाड झाल्यामुळे तसेच संबंधित एजन्सीला देयक प्राप्त न झाल्यामुळे सद्य:स्थितीत सदर मिनी ट्रेन अद्यापपर्यंत कार्यरत झालेली नाही. संबंधित एजन्सीला देयक अदा केल्यानंतर त्यांच्यामार्फत मिनीट्रेनची दुरुस्ती करुन घेऊन नागरिकांसाठी मिनी ट्रेन सुरु करण्यात येईल, असे औरंगाबाद महानगरपालिकेने कळविलेले आहे.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात मॅट्रिकेत्तर व्यावसायिक अभ्याक्रमांसाठी जात प्रमाणपत्राची सक्ती केली जात असल्याबाबत

**(३१) ४११२६ (०६-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात काही अभ्यासक्रमांसाठी मॅट्रिकेत्तर व्यावसायिक अभ्याक्रमांसाठी जात प्रमाणपत्र सादर करण्याची अट लागू नसताना त्यासाठी सक्ती केली जात असल्याने हजारो विद्यार्थी त्रस्त झाले असल्याचे दिनांक २३ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय

(२) असल्यास, शासनाने प्रशासनाला स्वयंस्पष्ट आदेश देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१२-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातंर्गत मॅट्रिकेत्तर विद्यार्थ्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्था +२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासकम राबविण्यात येतात. यामध्ये आरक्षित जागांवर प्रवेशासाठी जात प्रमाणपत्राची आवश्यकता असते. जात प्रमाणपत्र नसणाऱ्या उमेदवारांचा विचार खुल्या जागासाठी केला जातो.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**सोलापूर येथे राज्य मागासवर्गीय आयोगाला निवेदन सादर करताना श्री.शंकरराव लिंगे यांच्यावर हल्ला करण्यात आल्याबाबत**

**(३२) ४१२६० (०२-०८-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर येथे राज्य मागासवर्गीय आयोगाला निवेदन सादर करताना ओबीसी समाजाचे श्री शंकरराव लिंगे यांच्यावर हल्ला करण्यात आल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ओबीसी समाज सनदशीर मार्गाने राज्य मागासवर्गीय आयोगाला निवेदन सादर करीत असताना त्यांच्यावर हल्ला करण्याचे कारण काय आहे, याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर प्रकरणी प्राप्त फिर्यादीवरून सदर बझार पोलीस स्टेशन, सोलापूर शहर येथे गु.र.नं. ३३६/२०१८ भा.दं.वि.स.कलम ३५५, ३४१, ४२७, ३२३, ५०४, ५०६, ३४ प्रमाणे दिनांक ०४/०५/२०१८ रोजी गुन्हा दाखल करण्यात आलेला

असून, याप्रकरणी दिनांक ३०/०६/२०१८ रोजी मा.न्यायालयात दोषारोपपत्र सादर करण्यात आले आहे.

सदर गुन्हा न्यायप्रविष्ट आहे.

(३) विलंब झालेला नाही.

---

## मुंबईतील संयुक्त महाराष्ट्र चळवळीतील हुतात्म्यांच्या वारसांचा शोध घेऊन त्यांना घर देण्याबाबत

**(३३) ४१३८१ (०२-०८-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील संयुक्त महाराष्ट्र चळवळीतील १०५ हुतात्म्यांच्या वारसांना सन २०१२ मध्ये घरे देण्याचे शासनाने जाहीर केल्यानुसार आजपर्यंत दोनच वारसांनी अर्ज केले,हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उर्वरित वारसांचा शोध म्हाडा प्राधिकरणाला लागलेला नाही वा शोध घेण्यात अपयश आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, हुतात्म्यांच्या वारसांचा शोध घेण्याकरीता शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२३-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

उपध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांच्याकडून प्राप्त अहवालानुसार. दिनांक २८/०६/२०१२ रोजी एकूण ६९२५ घरांची सोडत काढण्यात आली, त्यामध्ये मुंबई मिल मधील एकूण २३ सदनिका महाराष्ट्र राज्य निर्मितीच्या चळवळीत हुतात्मे झालेल्या गिरणी कामगारांच्या वारसांसाठी राखीव ठेवण्यात आलेल्या आहेत. सदर २३ सदनिकांपैकी हुतात्मे झालेल्या गिरणी कामगारांच्या वारसांपैकी श्रीमती रुख्मिणी कृष्णा शिंदे यांना दिनांक १२/०६/२०१३ रोजी व

श्रीमती चंद्रभागा भिकाजी रंगाटे यांना दिनांक १४/०८/२०१४ रोजी अशा दोन वारसांना शासनाच्या निर्देशानुसार मोफत सदनिकेचे मोफत वितरण करण्यात आलेले आहे. राखीव २३ सदनिकांपैकी २१ सदनिका वितरण अभावी रिक्त आहेत.

(२) व (३) हे खरे नाही. म्हाडाच्या मुंबई मंडळामार्फत Whats App या सोशल मिडीयाव्दारे हुतात्मा गिरणी कामगारांसाठी राखीव ठेवण्यात आलेल्या घरांबाबत माहिती प्रसिध्द करुन संबंधित हुतात्मा गिरणी कामगारांच्या वारसांना म्हाडाकडे अर्ज सादर करण्याचे आवाहन करण्यात आले होते. त्या अनुषंगाने १० अर्ज म्हाडा कार्यालयास प्राप्त झाले असून याबाबतची छाननी कामगार विभागामार्फत करुन पुढील कार्यवाही करण्यात येणार आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही

---

## राज्यात औद्योगिक शिक्षण व प्रशिक्षण संस्थांतर्गत नियमित वेतन श्रेणीतील रिक्त पदे भरण्याबाबत

**(३४) ४१५१५ (०२-०८-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.गोपिकिशन बाजोरीया : तारांकित प्रश्न क्रमांक ३८००८ ला दिनांक ७ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात औद्योगिक शिक्षण व प्रशिक्षण संस्थांतर्गत नियमित वेतन श्रेणीतील १४६३५ मान्य पदापैकी ४२७१ पदे रिक्त असून औरंगाबाद विभागात १२३१ निर्देशकांची गरज असून त्यापैकी ६७८ पदे भरलेली आहेत तर ४६१ पदे रिक्त आहेत तसेच मराठवाड्यातील बहुतेक आय.टी.आय. मध्ये प्रभारी प्राचार्य कार्यरत निर्देशकांची पदे रिक्त असल्याने विद्यार्थ्यांना आवश्यक/पुरेशे शिक्षण मिळण्यास अडचणी येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्थाना सन १९८८ पासून वेतनेत्तर अनुदान व उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमात सुधारणा किती वेळा करण्यात आली असून यंत्रसामुगी व हत्यारांसाठी किती अनुदान देण्यात आले आहे,

(३) तसेच राज्यात सैनिक भरतीसाठी उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांना सामावून घेतले जात नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने रिक्त पदे भरण्याबाबत तसेच उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना शिकाऊ उमेदवार मिळण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना/कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२२-१०-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

राज्यात व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाची एकूण मंजूर पदे १४६३५ असून त्यापैकी भरलेली पदे ९९११ व रिक्त पदे ४७२४ आहेत. औरंगाबाद विभागातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील शिक्षकीय एकूण मंजूर पदे १०७८ असून त्यापैकी भरलेली पदे ६६४ व रिक्त पदे ४१४ आहेत.

दरम्यान, ज्या संस्थेत पदे रिक्त आहेत, अशा पदांवर अन्य कर्मचारी सेवावर्गाने भरण्यात आले आहेत. तसेच, ज्या ठिकाणी कर्मचारी उपलब्ध झालेले नाहीत, अशा व्यवसायांकरीता संस्थांस्तरावरुन तासिका तत्वावर नेमणुक करुन पदे भरण्यांत आली आहेत. ज्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये प्राचार्यांची पदे रिक्त आहेत, त्या ठिकाणी जवळच्या संस्थेतील प्राचार्यांना अतिरीक्त कार्यभार सोपविण्यात आलेला असून औद्योगिक प्रशिक्षण संस्थांतील प्रशिक्षणाचे कामकाज सुरळीतपणे सुरु आहे.
(२) सन १९८८-८९ पासून सन २०१७-१८ पर्यंत उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्थांना रुपये ३०,१५,४२,०००/- इतके अनुदान देण्यात आले आहे. उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम सन १९८८-८९ पासून सुरु करण्यात आले व त्यात एकदाच कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय, क्रमांक व्हिओसी-२०१५/प्र.क्र.९६/व्यशि-४, दिनांक २७/११/२०१५ नुसार सुधारणा करण्यात आली आहे.

उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्थांना सन १९८८ पासून यंत्रसामुग्री व हत्यारांसाठी रुपये ३५४४.१३ लाख इतके अनुदान देण्यात आले आहे.
(३) होय, हे खरे आहे.

(४) व (५) उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम (HSC Vocational) या शैक्षणिक अर्हतेला केंद्र शासनाचे संरक्षण खाते, उच्च माध्यमिक विज्ञान आणि कला शैक्षणिक अर्हतांशी समकक्ष मानत नसल्याने संरक्षण खात्यामधील अनेक पदांसाठी हे विद्यार्थी अपात्र ठरतात, हे खरे आहे. सेवाप्रवेश नियम हे प्रत्येक विभागाचे वेगवेगळे असल्यामुळे त्यामध्ये उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांचा समाविष्ट करण्याची बाब कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अखत्यारित नाही.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अखत्यारितील पदांचा आढावा घेऊन आकृतिबंध मंजूर करण्याबाबतची कार्यवाही वित्त विभागाच्या सल्ल्याने सुरू आहे. आकृतिबंध मंजूर झाल्यानंतर रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

दरम्यान, प्रवेशित प्रशिक्षणार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये म्हणून संस्थास्तरावरील शिल्प निदेशकांच्या रिक्त पदांवर तासिका तत्वावर पर्यायी शिक्षकांची नेमणुक संस्थास्तरावरुन करण्यात आली असून विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण सुरु आहे. तसेच, ज्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये प्राचार्यांची पदे रिक्त आहेत त्या ठिकाणी जवळच्या संस्थेतील प्राचार्यांना अतिरीक्त कार्यभार सोपविण्यात आलेला असून औद्योगिक प्रशिक्षण संस्थांतील प्रशिक्षणाचे कामकाज सुरळीतपणे सुरु आहे.

जुन्या ३० व्यवसाय अभ्यासक्रमांपैकी २८ व्यवसाय अभ्यासक्रमांचा समावेश अँप्रेटिसशिप अॅक्टमध्ये करण्यात आलेला होता. परंतु नवीन पुनर्रचित व्यवसाय अभ्यासक्रमानुसार काही व्यवसाय अभ्यासक्रम एकत्रित करुन ३० ऐवजी २० नवीन पुनर्रचित व्यवसाय अभ्यासक्रम तयार करण्यात आलेले आहेत. त्या अभ्यासक्रमांचा समावेश अॅप्रेंटिसशिप अॅक्टमध्ये करणेबाबत Central Apprenticeship Council (CAC), नवी दिल्ली यांना व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र दिनांक २२ नोव्हेंबर, २०१६ व दिनांक २२ नोव्हेंबर, २०१६ अन्वये कळविण्यात आले असून संचालनालयस्तरावरुन पाठपुरावा सुरु आहे.

## राज्यात पोलीस ठाण्यामध्ये नोंदविण्यात आलेल्या गुन्हयांतील आरोपींना अटक करण्याबाबत

**(३५) ४१५८९ (०२-०८-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, अॅड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २०१७ मध्ये विविध पोलीस ठाण्यामध्ये नोंदविण्यात आलेल्या खून, मारामाऱ्या, दरोडे, जबरी चोरी, बलात्कार, दुखापत आदि प्रकारच्या ८६७५० गुन्हयांपैकी ६५ हजार गुन्हयांतील आरोपींना अद्याप अटक करण्यात आले नसल्याचे एका पहाणीमध्ये निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सन २०१७ च्या वर्ष अखेर डिसेंबर मासिक गुन्हे अहवालावरुन राज्यात २०१७ मध्ये विविध पोलीस ठाण्यामध्ये नोंदविण्यात आलेल्या खून, मारामाऱ्या, दरोडे, जबरी चोरी, बलात्कार, दुखापत आदि प्रकारचे ५६२१७ गुन्हे दाखल असून त्यापैकी ५२४७१ गुन्हे उघड आहेत. तसेच या गुन्हयांपैकी ३११८० गुन्हयांचे दोषारोप पत्र व त्या गुन्हयांतील आरोपींना अटक करुन प्रकरणे न्यायालयात पाठविण्यात आली आहेत. उर्वरित गुन्हे पोलीस तपासावर आहेत.

(२) सन २०१७ मधील गुन्हयांचे उघडकीस येण्याचे प्रमाण ९३.२५% असून न्यायालयात दोषारोपपत्र पाठविलेल्या प्रकरणांचे प्रमाण ५५.४१% आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही

---

## नगरपालिकांमध्ये खाजगी अभियंत्यांच्या सहाय्याने प्रकल्प अहवाल तयार करण्यात येत असल्याबाबत

**(३६) ४२०४६ (३०-०८-२०१३). श्री.गोपीकिसन बाजोरिया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास योजनेंतर्गत घरकुल योजना व भूमीगत गटार योजना या शासनाच्या महत्वाकांक्षी योजना आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाराष्ट्रातील अ, ब, क व ड दर्जाच्या नगर पालिकांमध्ये अभियंत्यांच्या सहाय्याने तपशिल प्रकल्प (डी.पी.आर.) अहवाल बनविण्यात येत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, एका महानगरपालिकेत एकाच स्कीमचे अनेक तपशील प्रकल्प अहवाल (डी.पी.आर.) तयार करण्यात येत आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सारखेच तपशील प्रकल्प अहवाल (डी.पी.आर.) प्रत्येक महानगरपालिकेमध्ये सादर करण्यात येतात व कोट्यवधील रुपयांची देयके काढण्यात येतात, मात्र प्रत्यक्षात अनेक ठिकाणी घरकुल योजनांचे काम सुरु देखील झाले नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, या संदर्भात शासन स्तरावरुन काय कार्यवाही सुरु आहे ?

**श्री.प्रकाश महेता (१०-०९-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) केंद्र शासन पुरस्कृत "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय शहरी पुनरुत्थान अभियान" अंतर्गत शहरी गरीबांकरीता मुलभूत सुविधा (बीएसयुपी) व एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आयएचएसडीपी) या घरबांधणी सोयी सुविधा पुरविण्याबाबतच्या योजना कार्यान्वित केलेल्या आहेत. सदर योजनेची अंमलबजावणी व सविस्तर प्रकल्प अहवाल स्थानिक स्वराज्य संस्थेमार्फत तयार करण्यात येतात.

(३) व (४) हे खरे आहे.

संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रात त्यांनी केलेल्या सर्वेक्षण व जागेची पाहणी करुन उपलब्धतेनुसार विविध टप्प्यांतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल सादर केलेले असून, अशा सविस्तर प्रकल्प अहवालाना केंद्र शासनाची मंजूरी प्राप्त झाली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर महानगरपालिकेने शहरातील मालमत्तांचे सर्वेक्षण करण्याची जबाबदारी दिलेल्या सायबरटेक सिस्टीम अॅण्ड सॉफ्टवेअर कंपनीने सर्वेक्षणाचे काम पूर्ण करण्याबाबत

**(३७) ४२१३२ (०२-०८-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर महानगरपालिकेने शहरातील मालमत्तांचे सर्वेक्षण करण्याची जबाबदारी सायबरटेक सिस्टीम अॅण्ड सॉफ्टवेअर कंपनीकडे दिल्यानंतर कंपनीने निर्धारित कालावधीत सर्वेक्षणाचे काम पूर्ण केलेले नसल्याची बाब माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त कंपनीने केलेल्या सर्वेक्षणात मोठ्या प्रमाणात त्रुटी असल्यामुळे कर वसुलीचे उद्दिष्ट महानगरपालिकेला गाठता आले नसल्यामुळे सदर कंपनीने केलेली चूकी सुधारण्यासाठी प्रोजेक्ट मॅनेजमेंट कन्सलटंट (पीएमसी) ची नियुक्ती करण्यात आली असून त्यांचा खर्च महानगरपालिका अदा करणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त सायबरटेक कंपनीला कोणत्याही प्रकारचा दंड लावण्यात आलेला नसल्यामुळे सदर कंपनीकडून पीएमसीचे रक्कम वसूल करण्याबाबत तसेच सर्वेक्षणाच्या कामाची दिलेली रक्कम दंडासह वसूल करण्याबाबत शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-१०-२०१८) :** (१) तांत्रिक अडचणी तसेच कंपनीच्या नियंत्रणाबाहेरील कारणामुळे मालमत्ता सर्वेक्षण होवून डाटा जमा न झाल्याचे मे, २०१७ मध्ये निदर्शनास आले आहे.

(२) कंपनीने सर्वेक्षणात मोठ्या प्रमाणात त्रुटी केली व त्यामुळे वसुलीचे उद्दिष्ट महानगरपालिकेला गाठता आले नाही, ही बाब खरी नाही.

तसेच यासाठी कोणत्याही पीएमसी ची नियुक्ती करण्यात आलेली नाही. तथापि, मालमत्ता कर व कर आकारणी विभागाच्या कामात पारदर्शकता व सुसुत्रता आणण्याच्या हेतूने आर.पी.एफ. प्रक्रिया राबवून पीएमसी च्या नियुक्ती करण्याबाबत स्थायी समितीने दिनांक १०/०५/२०१८ ठरावा अन्वये मंजुरी प्रदान केलेली असून, त्यानुसार उचित कार्यवाही सुरु असल्याचे, आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांच्या अहवालात नमूद आहे.

(३) व (४) उक्त खाजगी संस्थेद्वारा गोळा केलेल्या डाटामध्ये व वास्तविक डाटामध्ये आरपीएफ दस्ताऐवजातील कलमानुसार ठरवून दिलेल्या मर्यादेपेक्षा जास्त त्रुटी आढळल्यास संबंधित कंपनीवर दंड आकारण्याची तरतूद आहे, त्यानुसार उचित कार्यवाही केली जात असल्याचे, आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे.

---

## राज्यातील प्रमुख शहरात नगररचना योजनांच्या (टीपी स्कीम) अंमलबजावणीस विलंब होत असल्याबाबत

**(३८) ४२२८७ (०२-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील प्रमुख शहरात नगररचना योजनांच्या (टीपी स्कीम) अंमलबजावणीस होणारा विलंब टाळण्यासाठी नगररचना आणि मूल्यनिर्धारण संचालनालयाकडून टीपी स्कीमसाठी नविन धोरण आखण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी संचालनालयाकडून पाच सदस्यीय विचारगट (थिंक टॅक) स्थापन करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर विचारगट यासंदर्भातील नियमावली कधीपर्यंत तयार करणार आहे व त्याकरीता किती कालावधी निर्धारित करण्यात आला आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-१०-२०१८) :** (१) अशी बाब नाही,

तथापि अधिनियमातील तरतुदींनुसार नगर रचना योजना जलदगतीने तयार करणेसाठी उपयुक्त मार्गदर्शक सूचना तयार करण्याची बाब नगर रचना संचालनालयाच्यास्तरावर विचाराधीन आहे.
(२) नाही. तथापि, संचालनालयामध्ये सर्वच महत्वाच्या व धोरणात्मक बाबींवर विचार-विनिमय करण्यासाठी संचालनालयाच्यास्तरावर एक विचारगट गठीत करण्यात आला आहे.
(३) कालावधी निश्चित करण्यात आलेला नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## म्हाडामधील रिक्त पदे भरण्याबाबत

**(३९) ४२३५९ (०२-०८-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) म्हाडामध्ये अभियंता, लिपिक, शिपाई तसेच भाडे वसूल करणारे कर्मचारी असे एकूण ४६० पदे रिक्त असल्याचे दिनांक १ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर पदे रिक्त असल्यामुळे म्हाडाच्या कामकाजावर परिणाम होत असून सर्वसामान्यांना अडचणी निर्माण होत आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन म्हाडामधील रिक्त पदांचा आढावा घेऊन पदे भरण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१२-१०-२०१८) :** (१) म्हाडामध्ये दिनांक १/१२/२०१७ रोजी एकूण ४३४ पदे रिक्त होती.

(२) म्हाडा प्राधिकरणाच्या आस्थापनेवर अभियंता संवर्गात ५६७, लिपीक/भाडेवसुलीकार संवर्गात ९९७ व शिपाई संवर्गात २७४ पदे मंजूर आहेत. यापैकी रिक्त पदांची संख्या साधारणत: २०% इतकी आहे. ८०% इतकी पदे भरलेली असल्याने कामकाजावर परिणाम होत नाही.

(३) व (४) मा.सर्वोच्च न्यायालयात आरक्षणाने पदोन्नती देण्याबाबत प्रकरण प्रलंबित असल्यामुळे केवळ खुल्या प्रवर्गातून पदोन्नतीने पदे भरण्याबाबतची कार्यवाहीद्वारे म्हाडा प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील रिक्त असलेल्या पदांपैकी जानेवारी, २०१८ पासून तांत्रिक संवर्गातील २४ पदे व अतांत्रिक संवर्गातील २० पदे पदोन्नतीने तसेच अनुकंपा तत्वावर कनिष्ठ लिपीक संवर्गात १ पद व शिपाई संवर्गात ३ पदे भरण्यात आली आहेत.

मा.सर्वोच्च न्यायालयाने पदोन्नतीने आरक्षणाबाबत दिलेल्या निकालानुसार प्राप्त होणाऱ्या मार्गदर्शक सूचनांनुसार रिक्त पदे भरण्याबाबतची उचित कार्यवाही करण्याबाबत म्हाडा प्राधिकरणास कळविण्यात येईल.

---

## राज्यातील ग्रामीण भागातील महा-ई-सेवा व सीएससी केंद्र सुरु करण्याबाबत

**(४०) ४२३६१ (०२-०८-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामीण भागात सदय:स्थितीत आधारकार्ड योजनेचा बोजवारा उडाला असून शासनाच्या नवीन नियमावलीनुसार शासकीय जागेत सुरु असलेल्या केंद्राना आधार नोंदणीचे अधिकार दिल्याने ग्रामीण भागातील महा-ई-सेवा व सीएससी केंद्र बंद झाल्याने नागरीकांना आधारकार्ड काढणे व दुरुस्ती करणे अशक्य झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रत्येक गावाच्या लोकसंख्येच्या आधारे गरजेइतकी आधार नोंदणी व दुरुस्ती केंद्रे चालू ठेवण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही. महाराष्ट्रातील विविध शासकीय कार्यालयामध्ये एकूण ३३१३ आधार कायमस्वरुपी नोंदणी केंद्रे स्थापन करण्यात आली आहेत. आधारकार्ड नोंदणी व मशीन दुरुस्तीचे काम महा-ई-सेवा व सीएससी केंद्रामध्ये सुरळीतपणे चालू आहे.
(२) हे खरे आहे. २०११ च्या जनगणनेच्या आधारे प्रत्येक जिल्ह्यात आधार नोंदणी केंद्राची संख्या निश्चित करण्यात आली असून त्यानुसार जास्तीत जास्त आधार यंत्रणे वाटप करण्यात आली आहेत. तथापि ज्या जिल्ह्यामध्ये आधार यंत्रणाची संख्या कमी असल्याचे आढळून आली आहे व ज्या जिल्ह्यामध्ये आधार यंत्रणाची संख्या अधिक आहे तेथील आधार यंत्रणे स्थंलातरीत करण्याच्या सूचना संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात आल्या आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे महानगरपालिकेतील कनिष्ठ अभियंता स्थापत्य व विद्‌युत सेवा पदे ज्येष्ठतेनुसार न भरल्याबाबत

**(४१) ४२६०४ (०२-०८-२०१८). श्री.अनिल भोसले** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे महानगरपालिकेने सन २०१७ मध्ये खात्यांतर्गत पदोन्नती करण्याचे परिपत्रक काढले असून एक वर्षाने जाहीर केलेल्या प्रथम सेवाज्येष्ठता यादी ९ स्थापत्य इलेक्ट्रिकल अभियंत्यांची नावे असताना अंतिम यादीत पाच नावे सेवाजेष्ठता म्हणून जाहीर करणे, त्यातील चार नावे वगळणे, वगळलेल्या चार अधिकाऱ्यांच्या नावांना मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार

डिप्लोमास लागू नसतानाही चुकीचे निकष लावून पुणे महानगरपालिकेने मा.सर्वेच्च न्यायालयाच्या आदेशाचे पालन न केल्याची बाब माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार उक्त प्रकरणी पुणे महानगरपालिकेच्या जबाबदार अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०९-२०१८) :** (१) व (२) पुणे महानगरपालिकेमधील वर्ग ३ व ४ मधील शेड्यूल मान्य पदावर कार्यरत सेवकांमधून कनिष्ठ अभियंता (स्थापत्य/विद्युत) या पदावर बढतीने नेमणूकीसाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या सेवक/कर्मचारी यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य/विद्युत) वर्ग-३ या पदावर बढतीने नेमणूक देणेबाबत दिनांक २१/०४/२०१७ अन्वये परिपत्रक प्रस्तुत करणेत आले होते. त्यानुसार कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदासाठी एकूण १० उमेदवारांचे अर्ज प्राप्त झाले होते. छाननी अंती १० अर्जांपैकी ६ अर्ज पात्र झाले. उर्वरित ४ अर्जदारांना जे.आर.एन. राजस्थान विद्यापीठामधून डी.सी.ई. पदविका प्राप्त केल्याने संबंधित विद्यापीठाकडून खातरजमा करणेस व मा.सुप्रिम कोर्ट यांचेकडील आदेशाचे अनुषंगाने विधी विभाग, पुणे महानगरपालिका यांचेकडून अभिप्राय घेण्यात आले व त्यानुसार कार्यवाही करण्यात आली आहे. तसेच विश्वविद्यालय अनुदान आयोग यांचे दिनांक १३/११/२००७ च्या पत्राच्या आधारे पूर्वी निवड केलेले ५ उमेदवार उर्वरित ४ उमेदवार यांच्या पदोन्नतीच्या पुढील कार्यवाही करण्यात येत आहे, असे पुणे महानगरपालिकेने कळविले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील मिहान प्रकल्पग्रस्ताना मोबदला देण्याबाबत

**(४२) ४२६२८ (०२-०८-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर येथील मिहान प्रकल्पामध्ये स्वस्त दरात जमिनी देण्यात येवूनही तेथे उद्योग सुरु करण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,
(२) असल्यास, मिहान प्रकल्पातील शेतकऱ्यांच्या किती वारसांना नोकरी देण्यात आली असून किती प्रकल्पग्रस्तांच्या केसेस मोबदल्यासाठी मिहान कोर्टामध्ये प्रलंबित आहे तसेच मिहान प्रकल्पाची सुरुवात केव्हा पासून झाली असून मिहान प्रकल्पाकरीता किती जमीन अधिग्रहित केली आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.

विशेष आर्थिक क्षेत्रातील विकसित भूखंड हे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या संचालक मंडळाने मंजूर केलेल्या नियोजित दराने देण्यात येतात. तसेच सेझ बाहेरील भूखंड सर्वसाधारणपणे निविदा प्रक्रियेचा अवलंब करुन आवंटीत करण्यात येतात. सेझमध्ये एकूण ७७ तर सेझ बाहेर २८ उद्योगांना भूखंड आवंटीत केले आहेत. सध्या सेझमध्ये ३० उद्योग कार्यरत असून आणखी ५ उद्योजकांनी त्यांना वाटप करण्यात आलेल्या भूखंडावर बांधकाम सुरु केले आहे. येत्या ६ महिन्यात आणखी १३ उद्योग बांधकाम सुरु करण्याच्या तयारीत आहेत. सेझ बाहेरील क्षेत्रामध्ये ९ उद्योग कार्यरत असून ४ उद्योगांच्या आवंटीत भूखंडावर बांधकाम सुरु आहे. तसेच या क्षेत्रामध्ये ८ उद्योग बांधकाम सुरु करण्याच्या तयारीत आहेत. ज्या उद्योगांनी कामे सुरु केलेली नाहीत, त्यांचेकडे पाठपुरावा करण्यात येत असून त्यांचेकडून याबाबत सकारात्मक प्रतिसाद मिळत आहे.
(२) मिहान प्रकल्पग्रस्तांकरीता रोजगार / स्वयंरोजगाराकरीता क्षमता विकास प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत असून या कार्यक्रमांतर्गत प्रकल्प बाधित गावांचे सर्व्हेक्षण करण्यात आलेले आहे. त्यानुसार १२५२ कुटुंबातील प्रत्येकी

एका व्यक्तीस रोजगार / स्वयंरोजगाराकरीता त्यांचे इच्छेनुसार प्रशिक्षण देण्यात आले आहे. तसेच मिहान प्रकल्पात कार्यरत विविध कंपन्यांमध्ये सुमारे १०,५०० व्यक्तींना त्यांचे शैक्षणिक अर्हतेनुसार नोकरी देण्यात आलेली असून, यापैकी ८५% उमेदवार हे नागपूर, अमरावती महसूल विभागातील आहेत. तर सदर ८५% उमेदवारांपैकी १०% उमेदवार हे मिहान प्रकल्पग्रस्त आहेत.

मिहान प्रकल्प नागपूरकरीता संपादित केलेल्या जमिनीबाबत भूसंपादन अधिनियम १८९४ चे कलम १८ अंतर्गत एकूण ११७९ संदर्भ अर्ज न्यायालयात दाखल करण्यात आलेले आहेत. त्यापैकी आजपावेतो ५२५ प्रकरणात न्यायालयाने निकाल पारीत केलेले आहेत. निकाल लागलेल्या प्रकरणात नियमानुसार सर्व प्रक्रिया पूर्ण करुन संबंधित उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) हे न्यायालयात मोबदल्याची रक्कम जमा करतात. आजपावेतो एकूण २०८ प्रकरणात एकूण १०४.८९ कोटी रुपये न्यायालयात जमा करण्यात आलेले आहेत.

इ.स. २००२ साली महाराष्ट्र विमानतळ विकास कं. मर्या. ची स्थापना झाली असून, सन २००६ मध्ये मिहान प्रकल्पासाठी विशेष नियोजन प्राधिकरण (Special Planning Authority) म्हणून मान्यता देण्यात आली आहे.

मिहान प्रकल्पासाठी एकूण २९६२.२९ हे.आर. जमीन भूसंपादन अधिनियम १८९४ च्या तरतुदीनुसार संपादित करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्हयातील विमाधारक शेतकऱ्यांना विम्याचा लाभ देण्याबाबत

**(४३) ४३०९१ (०२-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्ह्यातील नुकसानग्रस्त शेतकऱ्यांनी विमा काढूनही विमा कंपन्यांच्या निष्काळजीपणामुळे ४८ हजार शेतकऱ्यांना विम्याचा लाभ मिळाला नसल्यामुळे शेतकरी आर्थिक अडचणीत आले असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना विम्याचा लाभ देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०९-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप २०१७ अंतर्गत नागपूर जिल्ह्यातील ५०००६९ शेतकऱ्यांनी योजनेत सहभाग घेतला आहे. प्रस्तुत योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार विमा कंपनीमार्फत प्राप्त अंतरिम अहवालानुसार नागपूर जिल्ह्यातील १८६१ पात्र शेतकऱ्यांना रुपये १.८९ कोटी इतकी नुकसान भरपाई विमा कंपनीमार्फत अदा करण्यात आलेली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण + २ स्तर अंतर्गत शिक्षकांना वाढीव ग्रेड वेतन मिळण्याबाबत

**(४४) ४३२३० (०२-०८-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्‌योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण + २ स्तर अंतर्गत वेगवेगळे कौशल्याधिष्टीत अभ्यासक्रम सुरु करण्यात आलेले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर अभ्यासक्रमाला अध्यापन करीत असलेल्या शिक्षकांचा ग्रेड वेतन व उच्च माध्यमिक स्तरावर काम करणाऱ्या शिक्षकांचे ग्रेड वेतन यामध्ये तफावत असून सदर शिक्षकांना उच्च माध्यमिक शिक्षका प्रमाणे ग्रेड

वेतन मिळण्यासाठी विविध शिक्षक संघटनाकडून मागणी करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व याबाबत शासनाची भूमिका काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२२-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) पूर्णवेळ शिक्षक (सैधांतिक), + २ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम व उच्च माध्यमिक स्तरावरील काम करणाऱ्या शिक्षकांचे ग्रेड वेतन यामध्ये कोणतीही तफावत नाही.

व्होकेशनल इन्स्ट्रक्टर्स टिचर्स असोशिएशन संघटनेने पूर्णवेळ शिक्षक (प्रात्यक्षिक) यांना उच्च माध्यमिक स्तरावर काम करणाऱ्या पूर्णवेळ शिक्षकांप्रमाणे वेतनश्रेणी मिळावी याबाबतचे निवेदन दिनांक १४/१२/२०१७ रोजी दिले आहे.
(३) शासनाने दिनांक १८/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये व्यवसाय शिक्षण संचालनालयांतर्गत +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम/उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम (एम.एस.सी.व्होकेशनल) राबविणाऱ्या मान्यता प्राप्त शासकीय/अशासकीय अनुदानित संस्थामध्ये कार्यरत असणाऱ्या पूर्णवेळ निदेशक या पदाचे पदनाम “पूर्णवेळ निदेशकाच्या वेतनश्रेणीमध्ये पदनाम बदलानंतर कोणताही बदल केला जाणार नाही.” या अटीच व इतर अटीच्या अधिन राहून पूर्णवेळ शिक्षक (प्रात्यक्षिक) असे केलेले आहे.

श्री.सुनिल हरी पवार, श्री.मुकुंद खादवे व अस्मिता कापसे यांनी पूर्णवेळ शिक्षकाप्रमाणे (सैध्दांतिक) वेतनश्रेणी मिळणेबाबत. मा.उच्च न्यायालयामध्ये रिट याचिका दाखल केली असता मा.उच्च न्यायालयाने दिनांक २४/०२/२०१८ च्या आदेशान्वये “This Court Holds that, The full time instructions, who will be now called as full time teacher (Practical) cannot get equal status with full time teachers (theory) and they cannot get equal pay also” असे नमूद करुन सदर याचिका फेटाळण्यात आलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नांदेड जिल्हयातील भोकर शहरात वाहने उभी राहण्याकरीता पार्किग झोन उभारण्याबाबत

**(४५) ४३४५५ (०२-०८-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्हयातील भोकर शहरात वाहनांची संख्या वाढली असून वाहने उभी राहण्यासाठी पार्किग झोन नसल्याने दुचाकी, चारचाकी वाहने रस्त्यावर उभी केली जात असल्यामुळे शहरात वाहतूकीस मोठा अडथळा होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त शहरात वाहनतळांची निर्मिती करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०९-२०१८) :** (१) अंशतः खरे आहे.

(२) नांदेड जिल्हयातील भोकर शहरात लवकरात लवकर वाहनतळांची निर्मिती करण्यासंदर्भात आवश्यकती कार्यवाही करण्याबाबत जिल्हाधिकारी, नांदेड यांना निदेश देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पंढरपूर रेल्वे स्थानक येथे नवीन रेल्वे पोलीस स्टेशन स्थापन करण्याबाबत

**(४६) ४३९४५ (०२-०८-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पंढरपूर रेल्वे स्टेशन येथून मोठ्या प्रमाणात भाविक व प्रवाशांची वाहतूक होत असून सदर रेल्वे स्टेशनवर मोठ्या प्रमाणात चोरीच्या तक्रारी निदर्शनास आलेल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त ठिकाणी रेल्वे पोलीस स्टेशन नसल्याने कुर्डूवाडी येथे केस नोंदवावी लागत असल्यामुळे पंढरपूर येथे नवीन रेल्वे पोलीस स्टेशन स्थापन करणेबाबत मागणी केली जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पंढरपूर रेल्वे स्टेशनवर नवीन रेल्वे पोलीस स्टेशन स्थापन करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१८) :** (१) पंढरपूर हे महाराष्ट्रातील महत्वाचे तीर्थक्षेत्र असल्याने तेथे आषाढी, कार्तिकी, चैत्री एकादशीस मोठ्या प्रमाणात लाखोंनी भाविक येतात तसेच भाविकांची दररोज वर्दळ असते. पंढरपूर रेल्वे स्टेशन येथे सन २०१५ मध्ये ७, सन २०१६ मध्ये १३, सन २०१७ मध्ये १५ व सन २०१८ मध्ये २३ चोरीचे गुन्हे दाखल आहेत.
(२) पंढरपूर येथे नवीन रेल्वे पोलीस स्टेशन स्थापन करणेबाबत मागणी केली जात आहे, हे खरे आहे.
(३) पंढरपूर रेल्वे स्टेशनवर नवीन रेल्वे पोलीस स्टेशन स्थापन करणेबाबत रेल्वे प्रशासनाची संमती आवश्यक असल्याने त्याबाबत विभागीय रेल्वे प्रबंधक, सोलापूर विभाग, सोलापूर यांना विनंती करण्यात आलेली आहे.
(४) विलंब झालेला नाही.

---

## पुणे जिल्हयातील कात्रज घाटात सुरु असलेल्या अवैध खोदकाम व बांधकाम त्वरीत रोखण्याबाबत

**(४७) ४६३९९ (०४-०२-२०१४). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे जिल्हयातील कात्रज घाटात सुरु असलेल्या अवैध खोदकाम व बांधकामाबाबत संबंधित पोलीस स्टेशनला नोंदविण्यात आलेल्या गुन्हयाच्या अनुषंगाने पोलीस विभागाकडून तपास सुरु आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पोलीस तपासात काय आढळून आले व त्यानुसार अवैध खोदकाम व बांधकाम त्वरीत रोखण्याबाबत तसेच अवैध खोदकाम व बांधकाम करणाऱ्याविरुध्द कारवाई करण्याबाबत शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) मौजे शिंदेवाडी, ता.भोर येथील गट नं. ११२ (अ) मध्ये हायवे लगत पश्चिम बाजूस डोंगराचे उताराचे उत्खनन केल्याप्रकरणी राष्ट्रीय महामार्ग अधिनियम १९५२ चे कलम ८ ब पर्यावरण संरक्षण अधिनियम १९८६ चे कलम १५(१), (२) अन्वये राजगडे पो.स्टे. येथे गु.र.नं. १६/२०१३ नुसार दोन आरोपींविरोधात गुन्हा दाखल आहे.

तसेच सदर आरोपींनी वरील क्षेत्रात डोंगर उतारावर नैसर्गिक प्रवाहास अडथळा करुन रस्ते तयार केले व मा.न्यायालयाचे आदेशाचा गैरवापर केल्यामुळे महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १९४९ चे कलम ५२, ५३ अन्वये राजगड पोलीस स्टेशन गु.न.नं. १५/२०१३ अन्वये गुन्हा दाखल आहे.

उपरोक्त दोन्ही गुन्ह्यात न्यायालयात दोषारोपपत्र दाखल असून गुन्हा न्यायप्रविष्ठ आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मु.पो. पाचल (ता.राजापूर, जि.रत्नागिरी) येथील स्थानिक पोलीस स्टेशनमध्ये तक्रारदारांना संरक्षण देत नसल्याबाबत

**(४८) ४८२८६ (१५-०१-२०१४). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मु.पो. पाचल (ता.राजापूर, जि.रत्नागिरी) येथील अशोक रघुनाथ सक्रे यांच्याकडे असलेल्या पिस्तुल परवान्यामुळे ते गावात दहशत निर्माण करीत असल्याची व त्यांच्याविरुध्द तक्रार देणाऱ्यांना धमकी देत असल्याचे बाब माहे नोव्हेंबर, २०१३ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) तसेच, तेथील स्थानिक पोलीस स्टेशनमध्ये अशोक रघुनाथ सक्र विरुध्द तक्रारी अदखलपात्र घेत असून तक्रारदारांना संरक्षण देत नसल्याबाबतचे दिनांक २८ ऑक्टोबर, २०१३ रोजी निवेदन मा.गृह मंत्री यांना दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनामार्फत चौकशी करण्यात आली आहे काय,

(४) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसारर दहशत माजविणाऱ्या विरोधात कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे आहे.

अर्जदार यांनी मा.गृहमंत्री यांचेकडे ०२/०१/२०१४ रोजी केलेला तक्रारी अर्ज राजापूर पोलीस ठाणेस दाखल आहे.

(३) व (४) मौजे पाचल गावचे पोलीस पाटील तसेच प्रतिष्ठीत नागरिकांकडे चौकशी करता रघुनाथ सक्रे यांचेकडून अशा प्रकारचे वर्तन होत नसल्याचे सांगितले. अर्जदार यांनी पोलीस ठाणे राजापूर येथे समक्ष हजर होऊन तक्रार द्यावी असे दिनांक १९/११/२०१४ च्या पत्रान्वये कळविले असून त्यांनी अद्याप कोणतीही तक्रार दिलेली नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भातगाव-तिसंग (ता.गुहागर, जि.रत्नागिरी) या महिलेकडून लाखो रुपयांच्या ऐवजासह रोख रकमेची लुटकेल्याबाबत

**(४९) ४९०२२ (०१-०७-२०१४). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भातगाव-तिसंग (ता.गुहागर, जि.रत्नागिरी) या गाडीमध्ये शृंगारतळी येथून प्रवास करणाऱ्या एका महिलेकडून दिनांक २३ नोव्हेंबर, २०१३ रोजी वा

त्यासुमारास एका अज्ञात व्यक्तीने लाखो रुपयांच्या ऐवजासह रोख रक्कम चोरी केल्याची तक्रार पोलीस निरीक्षक, गुहागर येथे करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत चौकशी करण्यात आली आहे काय,
(३) असल्यास, चौकशीत काय निष्पन्न झाले आहे व तद्नुसार दोषींवर कोणती कारवाई केली आहे वा करण्यात येत आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

याबबात गुहागर पोलीस ठाण्यात कोणताही गुन्हा/तक्रारीची नोंद नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## खार (मुंबई) येथील पोलिसांना आपले गणवेश तसेच इतर काही महत्वाच्या वस्तु ठेवण्यासाठी सुविधा देण्याबाबत

**(५०) ४९७९३ (०३-०७-२०१४). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) खार (मुंबई) येथील पोलिसांना आपले गणवेश तसेच इतर काही महत्वाच्या वस्तु ठेवण्यासाठी कोणत्याही प्रकारची सुविधा नसल्याचे माहे फेब्रुवारी, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान आढळून आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पोलिसांना आपले गणवेश तसेच इतर काही महत्वाच्या वस्तु ठेवण्याबाबत शासनाने त्यांना सुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२४-०९-२०१८) :** (१) खार (मुंबई) पोलीस ठाणेची जागा अपुरी असून, पोलीस ठाण्यामध्ये गणवेश व इतर काही महत्वाच्या वस्तु ठेवण्याकरीता सध्याची उपलब्ध असलेली जागा ही अल्प प्रमाणात आहे.
(२) व (३) खार पोलीस ठाण्याच्या इमारतीकरीता वाढीव एफएसआय प्राप्त करुन सुव्यवस्थित पोलीस ठाणे इमारत बांधण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.